


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका











अनुक्रमणिका

भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक



*

वर्ष २२ वे

जून १९६६

मूल्य १। रुपया

*

# दीपावली

साहित्य-कला-संस्कृति

## श्रेयनामावलि—

- **आम्ही असे लिहितो**—गरजेपोटी सबकुछ—**मो. ग. रांगणेकर**—मुलाखत—**श्री. प्रभाकर अत्रे**
- **खास लेख**—शुद्ध घराणेदार संगीत जपणारा सारंगिया—**रामनारायण—भास्कर उत्तरवार** १८५७ आणि **माझा प्रवास**—एक नवे रसग्रहण—**डॉ. स. गं. मालशे.**
- **प्रवास**—[अजून चालू—चांगला म्हणून] **अंदमान ते आनंदमान—श्री. माधव राजवाडे**
- **चार भिन्न प्राकृतिक कथा**—डोळ्यात तुमचेच तर प्रतिबिंब—[**डोळे—डॉ. सदा कऱ्हाडे**] नको ते आयुष्य वाटयाला आले, तरीही [**पमाताई—वसंत फेणे**] हवं असलेलं थ्रिल चालत आलं, आणि [**थ्रिल—नीलकण्ठ नांदुरकर**] दिलेली (खरी) जबानी बदलायला ती तयार झाली [**लागेबांधे—ना. व्यं. देशपांडे**]

**या शिवाय**

ऐसी अक्षरें रसिके; असे पाहिले, असे ऐकले; व्यंगचित्रे, व्यंगकाव्ये वगैरे सारेच वाचनीय, प्रेक्षणीय, संग्राह्य.

**दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4

Gram : Dalalart

टे. नं. ३५७७६५










## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,

टेलिफोन : ३५७७६५ तारेचा पत्ता DALALART


● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# उधळित आली सुवर्ण, वर्षा

पुन्हा एकदा आकाशात ढग जमू लागले आहेत. अधुनमधुन विजा चमकू लागल्या आहेत. वादळ वारा पिंगा घालू लागला आहे. मधुनच एखादी सर, तपस्विनी धरतीला सुगंध अर्पित करीत निघून जाते आहे. ग्रीष्माचा ताप दीर्घकाळ सहन करून, आलेले कढ उरी साठवून ह्या धरतीने हे पुण्य आता गाठीला लावले आहेसे वाटते आहे. तो सुगंध सुटला आहे ना, तो मातीचा नाही. त्या तपस्येचा आहे. जे अंकुरणार आहे ना, त्यासाठी जो ओलावा धारण केला आहे ना, तो सुद्धा त्या नव्या सृजनासाठी मनोमन केलेल्या तपस्येतूनच आलेला आहे. आकाशीच्या त्या जलदांनी स्नेहवर्षाव करावा यासाठीच तर ही सारी तपश्चर्या! मग आकाश मेघांनी काळवंडले आहे म्हणून खंत कशाला? विजेच्या गर्जनांनी भिऊन जाण्याचे काय कारण? वादळ वाऱ्याने मनांत वादळ माजवून घेण्याची तरी काय गरज? अखेर हेच ऋतुचक्र नव्हे काय? ह्या ऋतुचक्रामुळेच तर मानवी जीवन सह्य होते आहे. होत आले आहे. हे मोती बरसतात म्हणून काळी माती मोत्यें अर्पण करते. हे वादळवात सैरावैरा धावतात म्हणून तर ग्रीष्माची काहिली कमी होते. ह्या विजा चमकून जातात म्हणून तर अंतःकरणांत कांहीं तरी आगळे प्रकाशून जाते. नव्या जीवनाचा बोध घडतो. साक्षात्कार घडतो.

ही माती खंबीर आहे. तपस्विनी आहे. साधक आहे. स्थितप्रज्ञ आहे. तिने युद्धेही पाहिली आहेत आणि बुद्धही पाहिले आहेत. तिने शिकंदरही पाहिले आहेत आणि पराक्रमी पौरसही पाहिले आहेत. तिने योगीहि पाहिले आहेत आणि स्वार्थी किड्यांचाहि तिला परिचय आहे. तिने रक्तांच्या नद्याही पाहिल्या आणि मानवतेची पूजाही पाहिली आहे. आणि म्हणूनच आज पुन्हां ढग जमू लागले आहेत, अंधारून आले आहे तरीही ती विचलित झालेली नाही. ज्यांनीं ग्रीष्म पचविला आहे त्यांना वर्षा विचलित करूं शकणार नाही ही तिची स्वतःची धारणा आहे. हा ओलावा ती धारण करते म्हणूनच येथे पूजा होत मानवतेची, साधुत्वाची, सुसंस्कारांची! जयजयकार होतो शांतीचा! पण तरीही ही माती हे जाणतेच की, इंद्रप्रस्थावर धर्माचे राज्य नांदावे म्हणून अखेर कौरवांचा पराभव करावा लागतोच. अन्यायाचा परिहार करण्यासाठीं 'न धरी शस्त्र करी मी' म्हणणाऱ्याला अखेर सुदर्शन हाती घ्यावे लागतेच! जगाची रीतच अशी आहे की, येथे सबलांची शांति टिकते. ही माती नेहमी शांतीचाच जप करीत आली आहे. पण ह्या मातीने युद्धेही पाहिली आहेत आणि ती धर्म्यही मानली आहेत.

ह्या मातीवर पुन्हां एकदां ढगांनी कृष्ण छाया धरली आहे. आकाश अंधारून आले आहे. विजा चमकू लागल्या आहेत. ग्रीष्माची काहिली संपली. घर्मबिंदूंनो, जा. भाजून पोळून काढणाऱ्या सूर्यकिरणांनो, विश्रांती घ्या. आतां धुळीचे कण पाय पोळून काढूं शकणार नाहीत. एक आगळा सुगंध मुक्त हस्ताने उधळीत ते चालत येतील. धरती तृप्त होईल. सृजन नवे लेणे लेवून मिरवील. शेते डोलतील. निर्झर गाणी गाऊं लागतील. नद्या मीलनाच्या बेहोषीने थयथय नाचत सागराकडे झेपावतील. पुन्हां सृष्टीला नवे, सुंदर, चेतोहर, रूप देण्यासाठी अवघी सृष्टि झटेल. ती गाणे गुणगुणत असेल——

आनंदी आनंद गडे
जिकडे तिकडे चोहिकडे

मोठ्या, चिरंतन टिकणाऱ्या आनंदासाठी आपण हे कृष्णमेघ सहन केले पाहिजेत. ही वादळे पचविलीच पाहिजेत. ह्या विजांचे आसुडही घट्ट मनाने पाठीवर झेललेच पाहिजेत. तोच तर आपल्या मातीचा धर्म आहे. तीच तर तिची प्रकृति आहे. तेच तर ह्या मातीच्या अजेयतेचे रहस्य आहे. जीवनांसाठी ही क्षणोक्षणीची 'अनंत मरणें' आधी मेलीच पाहिजेत. अशा मरणांनीच अखेर 'जीवनें' जगत असतात. ढग बरसतील आणि नवे सृजन जन्म घेईल. हाच सृष्टीचा अपरिहार्य असा न्याय नाही काय?

:—संपादक










# नंदलाल बोस

## चित्रकलेतील एक पर्व

**"माझी निष्ठा आणि कल्पकता ही भारतीय कलेचे भूत आणि भविष्य होय"** असे आत्मविश्वास-पूर्ण उद्‌गार काढणाऱ्या कलामहर्षि नंदलाल बोस यांच्या कलेचा हा अल्पसा परिचय--श्रद्धांजलिरूप परिचय !!

—दा. गो. देशपांडे

**चित्रकलेच्या** विश्वात विख्यात असलेले नंदलाल बोस ता. १६–४–६६ ला हा इहलोक सोडून गेले. वयाच्या ८३ व्या वर्षी त्यानी देह ठेवला. गेली काही वर्षे ते नाना व्याधींनी ग्रस्त होते. शेवटी देहभोग सरला आणि किर्तीरूप उरले ! ही किर्ती स्वार्जित आणि संपन्न होती. ही किर्ती अशा काळांत संपादित, संवर्धित आणि संतुलित केली की, जेव्हा जे जे म्हणून भारतीय ते ते अुल्लेखनीय गणले जात नव्हते. दुर्लक्षणीय समजले जात होते. ही स्थिति चित्रकलेच्या क्षेत्रात अवनिन्द्रनाथ ठाकुर या प्रज्ञावंताने आपल्या दैदिप्यमान प्रतिभाशाली कुंचल्याने पालटून टाकली. भारतीय चित्र कलेची अस्मिता ही किती दशदिशा अुजळणाऱ्या प्रभेने वलयांकित आहे हे, जगास दाखवून दिले. पाश्चात्य चित्रकलेच्या झगमगाटात बुजलेल्या भारतीय चित्रकलेला हेच श्वसन हवे होते, कारण इंग्रजांनी सुरू केलेल्या चित्रकलेच्या शिक्षणाने एकहि तळपणारा किंवा चमकणारा तारा निर्माण केला नव्हता. हे त्याचे अपयश बोलण्याने सिद्ध होणारे नव्हते. त्याला उदाहरण हवे होते. प्रात्यक्षिक हवे होते. प्रात्यक्षिक होते अवनिन्द्रनाथ ठाकुर आणि त्यानी नंदलाल बोस या शिष्याच्या रूपाने उदाहरण घालून दिले.

नंदलाल बोसांचे गुरू अवनिन्द्रनाथ होते हे खरे पण नंदलालांचा कलाविष्कार स्वतंत्रपणे विकासला आणि विलसला. नंदलालनी आपली कला अश्रापतेनं जोपासली आणि साधली. तिच्यावर कुणाचा प्रभाव पडला हे पाहू गेले तर कुण्या एका व्यक्ति–चित्रकाराचा प्रभाव पडला हे सांगता येणार नाही. अजंठ्याच्या चित्रमय नगरीचा त्यांच्यावर परिणाम झाला हे मत नाकारता येणार नाही. खुद्द नंदलालहि अमान्य करीत नसत. अजंठ्याच्या कलाप्रकाराने नंदलाल भारले हे खरे असले तरी नंदलाल बोसांच्या चित्रांत त्या रंगसंगतीच्या वैभवाचा अभाव दिसतो. रंग हे नंदलालच्या कुंचल्याचे खरे सामर्थ्य नव्हतेच. रेखा हे त्यांचे बल होते. त्यांच्या रेखा गतिशील प्रवाही आणि, आशयनिष्ठ वाटतात. अभिप्रेत चित्रविषयाला सजीव आणि सचेतन करतात.

आजकाल चित्रकलेची साधना आणि मान्यता ही सोपी आणि सवंग झाली आहेत. उद्योगव्यवसायातहि चित्रकलेची आवश्यकता असल्याने चित्रकलेची टूम बाजारभाव खाऊ शकते. त्यामुळे एखाद्या कलाकाराची प्रेरणा आणि धारणा या वर्षी कलाबाह्य ठरत नसल्या तरी कालबाह्य (out dated) ठरण्याची भीति निर्माण झाली आहे. कला जीवनांतल्या सौंदर्याचा वेध घेते, जीवन सुंदर करते, सुंदर जीवन संमूर्त करते. इ. इ. वाक्यांमागे हे जीवनाचे संचित ज्यात आहे. असे काही तरी 'अक्षय्य' आहे हे गर्भित आहे. त्याचा पडताळा मिळावा लागतो किंवा साक्षात्कार व्हावा लागतो. नंदलाल बोसांना आपल्या भारतीय संस्कृतीचा वारसा स्पर्शून आणि प्रेरित करून गेला, 'शिव' हा कलेचा आत्मा आहे याचा प्रत्यय मिळाला. आणि त्यांच्या चित्रकलेत 'शिव' अनेक अंगाने आविष्कृत आणि अलंकृत झाले आहे. याचा अर्थ असा नव्हे की, त्यांची चित्रसाधना एकाच प्रकारची असून नाविन्याने नटलेली नाही. त्यांचे 'सती' नावाचे चित्र इतके ख्याति पावले की, त्याचे

जापानी लाकडी रूप (wood cut) जगांत नावाजले, असे की, ते मुळांत नंदलालांचे आहे याचाहि विसर पडला. मागे एकदां त्यानी 'इलस्ट्रेटेड विकली' नाताळ विशेषांकाकरता बुद्धाच्या जीवनावर चित्रमाला गुंफली. विश्व कवि रवींद्रनाथांच्या साहित्याला नंदलालांच्या चित्रांनी सजवले आहे.

नंदलाल बोसनी अखिल भारतीय काँग्रेसची जी अधिवेशने हरिपुरा आणि फैजपुर येथे झाली तिथे काँग्रेसनगरी सुशोभित आणि सालंकृत केली हे आज कुणाला सांगितले तर खरे वाटणार नाही. परंतु नंदलाल बोसांच्या कलेची आणि भारतीय ख्याति काँग्रेसजनांच्या (म. गांधींच्या) कानावर गेली आणि नंदलाल बोसांवर ती नगरी सजवण्याची कामगिरी सोपवण्यात आली. नंदलालानी बांबू, तट्टया, मातीची पात्रे इ. इ. च्या आधारे एका वैराण परिसराला तोरणांनी, कमानीनी, फुलानी, मनोहारी सभामंडपानी आणि टुमदार—सुरेख झोपड्यांनी रम्य करून टाकले. याबाबतीत एक मजेदार आठवण अशी सांगतात की, काँग्रेसनगरी नंदलालानी सजवल्यावर गांधीजी तिचे निरीक्षण करावयास निघाले. एका झोपडीत खाटेखाली रंगाची टोपली आणि झाडू पडला होता. गांधीजीनी नंदलाल बोसना चटकन विचारले 'हे तुमच्या सौंदर्याच्या प्रमाणात येते काय?'—आणि सर्वजण खदखदले!

नंदलाल बोसांच्या भारतीय दृष्टीचा आणि कला व्यासंगाचा दाखलाच जणु या काँग्रेसनगरी प्रेक्षणीय करण्याच्या उद्योगांत सांपडला, वंगीय ग्रामीण जीवनाच्या 'पाता' चित्रणाचा आणि गुजराथी हेतुप्रधान चित्रांच्या नमुन्यांचा नंदलाल बोसांनी काँग्रेस नगरी देखणी करण्याकरता जो उपयोग केला त्यामुळे काँग्रेस नगरीतल्या प्रवेशद्वारांचे आणि आंतील सभास्थानांचे रंगीतवैभव नेत्रवेधक आणि नेत्रतोषक ठरले. पुढील काँग्रेस अधिवेशने जी होत गेली त्यांचा आदर्शच जणू नंदलालांनी घालून दिला. कारण पुढील काँग्रेस अधिवेशनांचे याबाबतीतले वळण य। परंपरे आणि प्रयेपासून फारसे दूर गेले नाही.

नंदलालांनी भारतीय परंपरा अशी आत्मसात केली म्हणून त्यांच्या चित्रकलेचा धंदा झाला नाही. तत्वाचे धोरण बदलले नाही. 'कैकयी', अहिल्या,' 'कर्ण', 'उमेचे दुःख' 'शिवाचा पार्वतीच्या मृत्युत्तर शोक', सुजाता' इ. इ. जी चित्रे गाजली त्याचे कारण त्यांच्या व्यक्तिमत्वांत ती दिव्यता मुरली आणि कुंचल्यातून पाझरली, खुलली आणि आसमंत व्यापून गेली, यामुळेच होय. यामुळेच आजन्म त्यानी शांतीनिकेतन येथे कलाभवनाचे प्राचार्य म्हणून अध्यापनाचे अखंड व्रत चालू ठेवले. त्यातूनच वंगाली चित्रकलेच्या एका परंपरेची जडण घडण झाली.

उंचीने खुजे, गोल चेहऱ्याचे, चष्म्यातून ज्यांचे डोळे अविरत सूक्ष्मतेने पाहत आहेत असे नंदलाल बोस कमालीचे साधे होते. या साधेपणात डॉ. राधाकृष्णन् यांनी म्हटल्याप्रमाणे (Simplicity is not poverty)

याची खूण पटत आहे. सुपाएवढे मन आणि कमालीची ऋजुता यांनी ते आपल्या विद्यार्थ्यांचे सदा 'प्रेयस' आणि 'श्रेयस' राहिले. त्यानी शिकवलेले असंख्य विद्यार्थी आणि शेकडो संस्मरणीय चित्रे ही त्यांची चालती–बोलती स्मारके झाली. त्यांनी काढलेल्या चित्रांनी जे लक्ष वेधले त्यांची संख्या हजाराच्यावर आहे.

'जेव्हां आविष्काराचे माध्यम तोकडे पडते आणि त्याचे प्रयोजन शिल्लक ठेवण्यासारखे असते तेव्हां प्रयोजनाला त्यजावयाचे नसते. पण नवी माध्यमें निर्मून त्याचे जतन करावयाचे असते. आणि कलाकाराने राष्ट्रीय आशा आकांक्षा अभिव्यक्त करण्याकरता नव्या माध्यमांचा संभव निर्माण केला पाहिजे.

"मी माझ्या बालपणापासून भारतीय कलेची सेवा साधना केली आहे आणि माझी निष्ठा आणि कला ही भारतीय कलेचे भूत आणि भविष्य होय."

कलेबद्दल अशी उर्ध्वगामी आणि अव्यभिचारी निष्ठा बाळगणारी आणि त्याला विधायक राष्ट्रीय अवगुंठन देणारी नंदलाल बोससारखी माणसे कमी होत चालली या वेदनेची तीव्रता शब्दाने सांगता येणार नाही अशी आहे.

●●●



नाटककार–मो. ग. रांगणेकर

९ आम्ही असे लिहितो

# नाटककाराची भूमिका वकिलाची आहे. समस्यांची उत्तरे देण्याचे बंधन त्याच्यावर नाही.......

मुलाखत–प्रभाकर अत्रे

**माणूस** म्हणजे स्वप्ने पाहणारा प्राणी अशी माणसाची एक व्याख्या कुणीतरी केली आहे. साऱ्याच माणसांना स्वप्ने पडतात. पण साऱ्यांच्याच स्वप्नांची कविता फुलत नाही. साऱ्यांच्याच स्वप्नातून प्रतिभा स्रवत नाही! सौंदर्याचे, साधुत्वाचे, महत्त्मतेचे महाभारत अवतरत नाही. जगाला नवी दिशा दाखविणारे महामंत्र अवतरत नाहीत. पण प्रतिभावंतांना क्षणाक्षणाला पडणाऱ्या नव्या स्वप्नांतून नवे जीवन आकार घेत असते. क्षणोक्षणी बदलणारे जगाचे नवे नवे रूप त्या स्वप्नांना दिसते. ती नवी रुपे प्रतिभेच्या स्पर्शाने शब्दांकित करण्याचा प्रयत्न करणे हे साहित्यिकातल्या स्वप्नाळूंचे काम! ह्या स्वप्नांना असते सौंदर्याचे वेड आणि म्हणूनच शब्दवेडा साहित्यिक हा नुसताच शब्द वेडा असत नाही. त्याला रंगांची किमया वेडी करते. सुरांतला रस त्याला मोहवितो. नादांचा मोह त्यालाही पडतो. आणि निसर्गांतल्या बोलक्या सौंदर्याचाही वेध त्याला बोलावून नेत असतो.

नाटककार मो. ग. रांगणेकर यांच्या सहवासात मला ह्या साऱ्या गोष्टींचा प्रत्यय आला. रांगणेकरांची नाटके मी पाहिली होती. काही वाचली होती. पत्रकार रांगणेकरांची कांही कारकीर्दही माझ्या जडणघडणीच्या काळांत मी पाहिली होती. त्यावेळी फारसं कळत नव्हतं. पण रांगणेकर हे एक धडपडे व अष्टपैलू गृहस्थ आहेत, येवढेच त्यातून जाणवत होते. नाटककार-दिग्दर्शक-निर्माता ह्या विविध भूमिका रांगणेकर वठवीत होते. नाटककाराची भूमिका आणि निर्मात्याची भूमिका ह्या भूमिका तशा मिळत्या जुळत्या नाहीत. एक स्वप्नाळू तर एक जमिनीला पाय घट्ट खिळवूं पहाणारी. त्यामुळे ह्या दोन्ही भूमिका पेलणारे रांगणेकर हे अर्थातच कुतुहलाचे विषय बनले होते. 'नाट्य-निकेतन' व रांगणेकर यांनी रंगभूमीच्या पडत्या काळांत कांही 'वेगळे' करून दाखविण्याचा प्रयत्न केला. पण अजूनही 'यशस्वी नाटकाची नाडी' सांपडली नसल्याची प्रामाणिक कबुली त्यांनी दिली. नाटक म्हटले की, 'प्रयोग' आलाच! रांगणेकरांच्या रक्तातच 'नाटक' असले पाहिजे. कारण त्यांतूनच त्यांच्या हातून घडलेल्या व घडत असलेल्या विविध प्रयोगांची संगति लागते. चित्रकार होऊं पाहणारे रांगणेकर पत्रकार झाले, नाटककार झाले. दिग्दर्शक झाले. पटकथा-संवाद लेखक झाले. चित्र-नाट्य निर्माते झाले, आणि आता आकाशवाणीचे एक 'निर्माते' झाले आहेत. पण चित्रकार मात्र झाले नाहीत. पण चित्रांचे वेड मात्र रांगणेकरांना सोडून गेले नाही. त्यांच्या घरी मी मुलाखतीसाठी गेलो. सुंदरशा कोचात स्थिरावलो. आणि समोरच्या भिंतीवरील चित्राने माझे लक्ष वेधून घेतले. ते चित्र मी आदल्याच महिन्यात भरलेल्या सौ. प्रफुल्ला जोशी यांच्या चित्रप्रदर्शनांत पाहिले होते. ते चित्र मलाच नव्हे तर महाराष्ट्रांतल्या फार मोठ्या 'नामवंत' कलाकारांना आवडले होते. त्या चित्रापाशी आम्ही बराच वेळ रेंगाळलोही होतो. ते चित्र रांगणेकरांच्या घरी साभिमान स्थिरावले होते. मी त्याना तसे बोलून दाखविल्यावर ते म्हणाले, 'माझी निवड बरोबर होती तर!' आणि ते दिलखुलास हंसले. रांगणेकरांच्या सहवासांत दोन गोष्टी मला प्रामु-








ऱ्याने जाणवल्या. त्यांचे बोलकेपण आणि त्यांचे हंसणे! खूप बोलतात. दिलखुलास बोलतात आणि मनमोकळे हंसतात. पण रांगणेकर 'एकसष्ट' वर्षाचे आहेत हे त्यांनी मला सांगितले तेव्हा मात्र माझा त्यावर विश्वासच बसेना. रांगणेकरांनी आयुष्यांत अनेक टक्केटोणपे खाल्ले. टीका सहन केल्या. बऱ्या वाईट अनुभवाचे संचित सांभाळले—काहीसे एकाकी जीवन काढले. मायेच्या माणसांचे प्रेम, कौटुंबिक जिव्हाळा, आईवडिलांचे सुख इत्यादि गोष्टींना ते वंचित राहिले. पण तरीही रांगणेकर 'फ्रेश' आहेत. त्यांची रसिकता कायम आहे. त्यांना अकाली प्रौढत्वाची बाधा झाली नाहीं. एकसष्टी सांगावी लागते. त्यांच्या चालण्या, बोलण्या, वागण्यांत जाणवत नाही. ह्या धमाल गर्दीतच रांगणेकरांची नाटके जन्मली आणि ह्यावद्दल बोलतांना ते म्हणतात. 'चिंतन' प्रतिभेचा स्पर्श, वगैरे त्यात काही नाही. गरजेपोटी नाटके लिहित गेलो. कधी कधीतर दिवसा तालीम घ्यायची आणि रात्री नाटकाचा पुढचा अंक लिहायचा ह्या पद्धतीने मी नाटके लिहिली आहेत. उगीच तुलना वगैरे काही केली जाऊ नये." रांगणेकरांच्या ह्या बोलण्यांत विनयही आहे. आणि वृत्तीचा प्रामाणिकपणाही! रांगणेकरांना गेली कित्येक वर्षे मी पाहतो आहे. नाट्यनिकेतनच्या वैभवकाळांतही मी त्यांना पाहिले आहे. आणि आताही पाहतो. त्यांच्या पोशाखात काहीही (अगदी टोपीचा रंग, चष्म्याची फ्रेम, कोटाचा रंग वगैरेतसुद्धां) फरक पडलेला नाही. गेली दोन वर्षे त्यांना मधुमेहाचा त्रास सुरू झाला आहे. पण आपल्या आजाराचे 'कौतुक' त्यांना ठाऊक नाही. उलट त्यावद्दलचा 'विनोद'च त्यांच्या तोंडून ऐकायला मिळतो. कांही काही माणसे चुकलेल्या स्टॉपवद्दल हळहळतांना दिसतात. रांगणेकरांच्या वृत्तीत ही हळहळ, खंत नाहीं. आणि म्हणूनच चित्रकाराचा 'स्टॉप' चुकलेले रांगणेकर हे अजूनही 'ताजे' वाटतात. ह्या वृत्तीतूनच त्यांनी 'संचय' केला नाही. (त्यांच्या कित्येक लेखांची कात्रणेही त्यांच्याकडे नाहीत—लिहित जायचं—करीत जायचं; येईल ते स्वीकारीत जायचे हीच वृत्ति) रांगणेकरांच्या निवृत्तीनंतरचे त्यांचे स्वप्न 'भव्य' आहे. भारतीय व मराठी रंगभूमीचे दृष्टीनेही ते उदात्त आहे. मोठी स्वप्ने पाहण्यासाठी व्यक्तित्वही मोठे असावे लागते. रांगणेकरांच्या स्वप्नांनीच त्यांचे व्यक्तिमत्व घडविले आहे. नवी स्वप्ने साकारतील (साकारोत अशी इच्छा) तेव्हां रांगणेकर आणखी 'मोठे' आहेत हे सिद्ध होईल. निवृत्तीनंतर "लागले नेत्र रे पैलतीरी" म्हणणाऱ्या वृत्तीपेक्षां "आतां मला '**माझ्या**' मनासारखी काही कामे निवांतपणे करता येतील" असे म्हणणाऱ्या रांगणेकरांची चिरनवता मला अधिक मोहविते. आपल्यालाही मोहवील.

**प्रश्न :—** आपल्या लेखनाला सुरुवात कशी काय झाली ?

**रांगणेकर —** माझे चुलतमामा रावसाहेब मोरमकर हे '**विविध ज्ञान विस्तार**' मासिक काढीत असत. त्यांच्याशी माझा तसा प्रत्यक्ष संबंध आला नव्हता. विस्तारातूनही मी लेखनाचा श्रीगणेशा केला नाही. खरं म्हणजे लेखनात मी अगदी विचित्रपणे पडलो. मला आर्टिस्ट-चित्रकार व्हायचं होतं. चित्रमहर्षि हळदणकर यांचा पट्ट शिष्य व्हायचं होतं. चित्रकला साधना जन्मभर करायची अशी माझी शाळेत असतांनाची धारणा होती. पण योगायोगाने इंग्रजी पांचवीत असताना चं. वि. बावडेकर (संपादक "आलमगीर" कित्ता-अत्रे) हे शाळेत आले. ते खांडेकरांचे शिष्य होते. बावडेकरांकडून मला लेखनाची प्रेरणा मिळाली. शाळेत आम्ही एक हस्तलिखित मासिक काढीत होतो. शास्त्री नावाचा मुलगा त्याचा संपादक होता. तो बावडेकर व मला नेहमी सल्ला विचारीत असे. पुढे त्याचे आणि आमचे मतभेद झाले आणि आम्ही जिद्दीने वेगळे मासिक काढायचे ठरविले. त्या मासिकाचे नाव '**अरुण**' असे होते. मी त्यावेळी इंग्रजी सातवीत होतो. त्या मासिकाचा चित्रकार मीच होतो. सारी सजावट मीच केली होती. पण लिहिण्याची कांही सवय नव्हती. आम्ही काढलेल्या 'अरुण' मासिकासाठी वर्गणीदार करायचे आम्ही ठरविले. आठ आणे वर्गणी ठरविली. पण एकच अंक साऱ्यांना कसा देता येईल म्हणून प्रश्न पडला. त्यावेळी '**शापिरोग्राफ**' यंत्राची जाहिरात आम्ही एका वृत्तपत्रात पाहिली. वीस बावीस रुपये खर्च करून आम्ही ते यंत्र मागविले. परंतु आमची फसगत झाली. त्यामुळे आमचा मजकूर घेऊन आम्ही त्यावेळचे लक्ष्मीनारायण प्रेसचे चालक अ. आ. मोरमकर यांच्याकडे गेलो व त्या मजकुराच्या **वीस** प्रति छापून मागितल्या. ते 'हजार प्रति घ्या' म्हणाले. आम्ही म्हणालो, "हजार प्रति काय करायच्या ?" त्यांनीं ६० रु. बिल होईल म्हणून सांगितले. त्यावेळी हे साठ रुपये सहाशे रुपयांसारखे होते. आम्ही क्राऊन साइझची ३२ पाने भरतील इतका मजकूर दिला आणि एक दिवस अंकाचे गठ्ठे घरी घेऊन आलो. तीन आणे किंमत ठेवली. ते अंक खपविण्यासाठी मी आणि बावडेकर चाळीचाळीतून हिंडलो. पेपर विक्रेत्यांना काही प्रति दिल्या. वडिलांनी त्यांच्या ऑफिसात काही प्रति खपविल्या. आम्ही एकूण ५२ रुपयाचे अंक विकले. वडिलांकडून आठ रुपये उसने घेतले आणि छापखान्याचे बिल दिले. मॅट्रिकच्या परीक्षेच्या निकालाच्या आदल्याच दिवशी '**अरुण**'चा पहिला अंक प्रसिद्ध झाला. **विश्वास**

वाढला. आम्ही मग दुसरा अंक काढला. तो ४८ पानी होता. बिल ९० रुपयाचे आले. ह्या सान्या गोष्टीमुळे एक गोष्ट मात्र साधली. रामभाऊ तटणीस (मोरमकरांचे भाचे) यांना एक साप्ताहिक काढण्याची इच्छा होती. त्यांना आमची हौस व उत्साह दिसत होता. त्यांनी शेवटी साप्ताहिक काढायचे ठरविले. माझ्या वडिलांची इच्छा होती की, मी हायकोर्ट वकील व्हावे. पण मला वकिलीत अजिबातच रस नव्हता. हळदणकर यांचा पट्टशिष्य होण्याची वाटही चुकली होती. आणि आम्ही नवीनच निघालेल्या 'विविधवृत्ताच्या कचेरीत दाखल झालो होतो. पु. वा, कुळकर्णी, श्री. म. वर्दे, वसंतराव नाईक, शिवराम वाशीकर वगैरे मंडळी त्यात होती. ललित विभाग आमच्याकडे सोपविला गेला होता. १९२५ साली त्यातून माझ्या लेखनास प्रारंभ झाला. १९२६ साली केवळ विनोदाला वाहिलेले **'तुतारी'** नावाचे साप्ताहिक त्यांनी काढले. मी त्याचा संपादक झालो. १९२९ साली श्री. रामभाऊ तटणीसांनी **'लोकहित'** नावाचे दैनिक काढले. त्यातही मी काम करीत होतो. तुतारींत मी विनोदी मजकूर लिहीत असे. त्यातल्या एका विनोदी चुटक्याने प्रेसवर जप्ती येईल असे तटणीसांना वाटले. मला ते पटले नाही. मी बदल केला नाही. त्यांनी ऐनवेळी बदल केला. मला ते आवडले नाही. मी 'तुतारीचा' राजिनामा दिला. बाहेर पडलो. मग 'तुतारी' ही बंद पडली. मी 'लोकहित' दैनिक साठी रात्र रात्र जागून खपत होतो. पण मी राजिनामा देऊन निघून गेल्यानंतर लोकहित, अरुण व तुतारी ही तीन्ही नियतकालिके बंद पडली. पण वृत्तपत्रीय जीवनाची चटक लागलेली होती. **'वसुंधरा'** साप्ताहिक मी काढले. बावडेकरांना बोलावले, पण ते आले नाहीत. जवळ भांडवल नव्हते. न. र. फाटक मला खाडिलकरांकडे घेऊन गेले. त्यांच्या छापखान्यांत साप्ताहिक छापण्याचे ठरले. वसुंधरेतून मात्र मी खूप नव्या नव्या series सुरू केल्या. **कॉलेजविश्व** त्यांतच प्रथम सुरू झाले. साहित्य, नाट्य, संगीत, क्रिकेट इ. विषयावर त्यात चटकदार लेखन येत असे. मराठीतील त्या काळात अग्रेसर असलेले लेखक 'वसुंधरे'तून लिहीत. मुलाखतीही त्यात असत. चालू कादंबरीही होती. **"आमचे खाजगी टपाल"** ही त्यात लिहीत होतोच. पुढे 'मौज'च्या भागवतांनी ते चालवायला घेतले. दत्तू बांदेकर हा completely

## रँग्लर अप्पासाहेब परांजपे : एक असामान्य व्यक्तिमत्व मुक झालें !

महाराष्ट्राचे एक थोर सुपुत्र, शिक्षण तज्ञ, भारताचे पहिले रँग्लर, विद्वान वक्ते, नेमस्त राजकारणी व प्रसन्न व्यक्तित्वाचे थोर गृहस्थ डॉ. रघुनायराव परांजपे ह्यांना अगदी आकस्मिकपणे ६ मे रोजी देवाज्ञा झाली. आणि मागच्या पिढीचा एक तेजस्वी वारसा गळून पडला. चहा पिता पिता खोकल्याची उबळ येते काय आणि पाच मिनिटात खेळ खलास होतो काय? सारेच अकल्पित पण अप्पासाहेबांचा मृत्यू हा त्यांच्या जीवनाला साजेसाच होता. झंझावती, गतिशील (त्यात प्रगति आलीच) जीवनाचा तो गतिशील शेवट. "मी शंभर वर्षे जगणार आहे" असं ते म्हणत असत. आपले आत्मचरित्रही त्यांनी वयाच्या ८४ व्या वर्षी लिहिले. आणि क्रिकेटच्या परिभाषेत त्याला 'एटीफोर नॉट आऊट' म्हणून नाव दिले. शतकवीर ते ठरले नाहीत दुर्दैवाने. पण त्यांच्या 'नॉट आऊट नव्वद' मध्ये मात्र त्यांनी बऱ्याचशा बाऊंड्या मारल्या. त्यांतल्या कांही सिक्सर्सही होत्या. भारताच्या आधुनिक इतिहासात र. पु. परांजपे हे नांव अनेक अर्थांनी सुवर्णाक्षरात नोंदवावे लागेल. फर्ग्यूसन कॉलेजातून ते पदवीधर झाले. नंतर ते केंब्रिजला गेले. आणि तेथे सीनियर रँग्लरशिप मिळविण्याचा अ-पूर्व मान पटकावला. १९०२ ते १९२० ह्या काळांत ते आपल्याच कॉलेजचे प्राचार्य होते (हेही अपूर्वच नव्हे काय?) त्याच काळात स्वा. सावरकर त्यांच्या कॉलेजात होते. परदेशी कापडाची होळी केल्याबद्दल त्यांना कॉलेजने 'रस्टिकेट' केले होते. परंतु आपल्या ह्या शिष्याबद्दल अप्पासाहेबांच्या मनात आदर-प्रेम-होते. ते त्यांनी नंतर वारंवार व्यक्तही केले. १९२० नंतर ते ह्या राज्याचे शिक्षणमंत्री होते. स्वतंत्र भारताचे ऑस्ट्रेलियातील हायकमिशनर म्हणूनही त्यांनी काम केले. पुणे, विद्यापीठाचे कुलगुरूपदही त्यांनी भूषविले. समाज सुधारक मतांमुळे, स्पष्ट व रोखठोक बोलण्यामुळे अप्पासाहेब कधी 'जनतेचे' पुढारी झाले नाहीत. पण बुद्धिमंतात त्यांना मानाचे स्थान होते. दिलखुलास व मनमिळाऊ स्वभाव, पूर्वग्रहरहित विचार करण्याची पद्धत व जीवनाकडे पाहण्याची स्थितप्रज्ञाची वृत्ति यामुळे अप्पासाहेबांचे भोवती माणसे खिळलेली असत. हवा हवासा वाटणारा हा माणूस होता. आज अप्पासाहेब निघून गेले आहेत. एक असामान्य बुद्धि, व्यक्तिमत्व मूक झाले आहे.

मुक्या मनाने शब्दांचे बुडबुडे उडवण्यापेक्षां आम्हीं त्यांच्या स्मृतीला अभिवादन करतो. (आणि ते मानत नव्हते तरी तो कुठेतरी आहे असे गृहित धरून ) ईश्वर मृतात्म्यास शांति देवो अशी प्रार्थना करतो.







अनुक्रमणिका

माझा product आहे हे मी अभिमानाने सांगतो. १९३२ साली मी पुण्याच्या **सरस्वती सिनटोन**मध्ये कथालेखक म्हणून गेलो. एक वर्षभर तेथे होतो. बांदेकरांची बहीण तेथे काम करीत होती. तेथे बांदेकरांचा परिचय झाला. पण त्यांना न्यूनगंड होता. ते दहा माणसात जात नसत. तमाशाला जाऊन बसत. शिक्षण नाही. नात्यागोत्याच्या माणसांचा आधार नाही. १९३३ साली त्यांची बहीण व धाकटा भाऊ पुण्यात अकस्मात निधन पावले. बांदेकर वैतागले आणि त्या वैतागाच्या भरात त्यांनी मला एके दिवशी चिठ्ठी पाठवली की, आपण आत्महत्या करणार आहोत. मी त्यांचा शोध करून त्यांना मुंबईला घेऊन आलो व माझ्या घरीच जवळ जवळ वर्षभर ठेवले. मला म्हणाले, "तुमच्याकडे काही काम न करता राहणे मला बरे वाटत नाही. मला काम द्या" तेव्हा मी त्यांना 'वसुंधरे'त आणले. शिक्षण कमी, वाचन पुष्कळ. लेखनात त्रुटितता होती. माझ्या हाताखाली साप्ताहिकात काम करीत असत. पण मला खरं पाहता त्यावेळी चित्रपटाची गोडी लागली होती. १९२४ ते १९३४ मी वृत्तपत्रात काम केले होते. मग भांडवलवाला गाठून मी 'सुवर्ण मंदिर' हे चित्र १९३४ साली काढले. लेखक, दिग्दर्शक मीच होतो. त्यावेळी पार्श्वगायन नव्हते. त्यात गणपतराव बोडस, हिराबाई, दिनकर कामण्णा, पद्मा शाळिग्राम, ज्योत्स्नाबाई ही मंडळी होती. पण फारसा तांत्रिक अनुभव गाठीला नसल्याने ते चित्र पडले.

प्रा. अनंत काणेकर त्यावेळी माझ्या शेजारीच रहात होते. ते एकेदिवशीं म्हणाले, "रांगणेकर, आपण साप्ताहिक काढूं या." मी वृत्तपत्रीय जीवनाचा भरपूर कटु अनुभव घेतला होता. त्यामुळे 'नको' म्हणालो. ते निदान माझे नाव तरी संपादक म्हणून असूं द्या. म्हणाले. मी संमति दिली. **चित्रा** साप्ताहिक आम्हीं सुरूं केले. (१९३५ साली) चांगले चालत असे. काणेकर 'बोलका ढलपा' लिहीत असत. पण पैसा अपुरा पडत होता. मग चित्रा लिमिटेड कं. केली. भांडवलदार गांठला. (लोटवाला म्हणून) 'चित्रा'चा खप वाढत गेला. म्हापणकरांचे भविष्य त्यात असे. १६,००० पर्यंत सेल गेला. पण तो नाखूषच होता. म्हणायचा "Bring the sales down!" "खर्च भागत नाही या सबबीवर आला. पगारही कमी केले. कंटाळलो. नंतर True stories च्या धर्तीवर 'सत्यकथा' काढली अशीच दुसऱ्या एका स्नेह्याच्या भिडेला बळी पडून, पण ३ अंकानंतर तेथूनही मी निघालो. 'सत्यकथे'चे त्यावेळचे रूप कायम नसले तरी ती अजून चालू आहे. नंतर काणेकर– रांगणेकर जोडीने पुन्हां एकदां 'आशा' साप्ताहिक सुरूं केले. तेही बरे चालले. पण पुन्हां भांडवल कमी पडून ते बंद करावे लागले.

**प्र :–** येवढ्या प्रदीर्घ लेखनानुभवातून नेमके साधले काय ?

**रां.:–** फार फायदा झाला. त्या सतत लेखनामुळे मी हमखास लिहू लागलो. नियमित लिहिण्याची; विविध विषयांवर हुकमी लिहिण्याची संवय लागली. लेखन हा व्यवसाय झाला. व्यवहार झाला. माझे सारे लेखनच मुळी व्यावसायिक झाले आहे. दैनिक, साप्ताहिकात सारे मोजून मापून हिशोबी लेखन— करावे लागले.

**प्र. :–** आपण कादंबरी नाटकाकडे कसे वळलांत ?

**रां. :–** गरजे पोटी ! व्यवसायातूनच कादंबरीही लिहिली गेली. चालू कादंबरी लिहिण्यामागची भूमिकाही कला निर्मितीची नव्हती. तर 'मजकूर' हा सामान्य 'व्यवहार' होता. व्यवसाय होता. आपण जाहिराती आणतो. बिलं आणतो त्यातलाच कादंबरी लेखन हा प्रकार ! गुरुवार ते शनिवार ह्यात मी सारे लेखन करीत असे. सारा एक खांवी तंबू होता.

( पृष्ठ ५४ वर पहा )







अनुक्रमणिका








[पर्व ४ थे]

अंदमानच्या ‘ कायाकल्प ’ कथेची ही तर नांदी ! १९५८ च्या स्वातंत्र्य दिनाचे मुहूर्तावर गायलेली ! धूसर स्वप्ने काही ‘ निगूढ गीती ’ गात होत्या, काय, कुठे, कसे……..प्रश्नचिन्हेच सारी…………

# अंदमान ते आनंदमान

-माधव राजवाडे

## आरंभ

**क्षेत्रफळाच्या** मानाने कमी वस्ती हा विषय कोणत्याहि शासकाला पंचवार्षिक योजनेच्या संदर्भात उत्तेजित करणारा. त्यातहि भारतात वाढती लोकसंख्या आणि वाढलेल्या लोकसंख्येची समस्या आ वासून सदा उभी असलेली. कुठे कुठे माणसे नीट वसवली तर ह्या लोकसंख्येच्या यक्ष प्रश्नाचा ताण कमी होईल हे प्रश्नचिन्ह नियोजकांना आणि शासकांना सतत खाद्य पुरवत आले आहे. आव्हान देत राहिले आहे. यात भर फाळणीनंतरच्या निर्वासितांची पडली. म्हणूनच दाट वस्ती, निर्वासित आणि तुरळक वस्ती असलेला प्रदेश यांचा विचार विकासाच्या दृष्टीने एक सम साधण्याचा प्रधान प्रकल्प झालेला आहे. अंदमानच्या भूमीत याला उत्साहवर्धक अवसर होता. त्या दृष्टीने पूर्वी प्रयत्न सुरू झाले.

इ. स. १९४५ साली त्यावेळच्या सरकारनं गुन्हेगारांचे गुन्हे माफ केले आणि सरकारी खर्चानं ज्याना परत आपल्या जन्मस्थानी जावयाचे असेल त्याना जाण्याची मुभा दिली. अजमासे पांच हजार लोकांनी ह्या मुक्ततेचा फायदा घेतला. इ. स. १९४६ च्या शेवटी परिणामतः लोकसंख्या ३३ टक्क्यानी घटली. ही जी माणसे गेली त्यामुळे त्यानी व्याप्त आणि काबीज जमीनहि मोकळी झाली. ३,००० वार जमीनीवर ही माणसे शेती करत होती. ‘अधिक धान्य पिकवा’ मोहिमेस आणि निर्वासितांची सोय करावयास यामुळे अनुकूल्य निर्माण झाले. इ. स. १९४९ ते १९५८ पर्यंत (म्हणजे मी अधिकारग्रहण करण्याच्या सुमारास ) बेंगाल, केरळ, बिहार आणि मद्रास येथील एकंदर २,६२८ कुटुम्बाना वसवण्यांत आले होते. या पुनर्वसनाला अधिक चालना देण्याच्या दिशेने कांहीं भरघोस केले पाहिजे या विचाराने माझ्या मनांत मूळ धरले. पूर्वबंगाल येथील भारतीयांचे पुनर्वसन करावयाचे होते. त्याला केवळ आरंभच झालेला होता.

——एक कल्पना किंवा योजना जेव्हां मनांत येते तेव्हां तिचे धागेदोरे कसे गुंतागुंतीचे असतात हे चटकन ध्यानांत येत नाही. माणसं नव्यानं वसवायची, म्हणजे त्यांना जमीन उपलब्ध करून देणें, अनुषंगीक व्यवसाय, दळणवळण, शेतीची आवजारं व जनावरे इ. इ. त्यांची अंगोपांगे अपरिहार्यपणे येतात. त्यांची सोय आणि सोयीचे सातत्य हे अन्तर्भूत केल्याखेरीज व्यवस्था जशी स्वयंपूर्ण होत नाही तद्वत यशस्वीपणे मार्गस्थ होत नाहीं. असं लक्षांत आलं की, शेतीची जमीन (Extra land) उपलब्ध नव्हती! जंगले विपुल होती. पण जंगलांची क्षमता, संपत्ति, आणि उत्पादकता बाधित न करता शेतीला ती जमीन वापरण्याचे धोरण दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत जे समाविष्ट होते ते पूर्णतः कार्यान्वित झाले नव्हते. बेटांचे एकूण क्षेत्रफळ ३,२१५ चौरस मैलांचे आणि पैकीं जंगलांचे राज्य २,५०० चौरस मैलावर. जंगलं नाहीशीं करावयाची तर जमीनीची भग्नता (Soil Erosion) टाळता आली पाहिजे. नाहीतर एक गाठ सोडवता सोडवता दुसरी कठिणतर गाठ बसायची . . .

—या संबंधांत गृहमंत्रालयाचे श्री. एच. आर. शिवदासानी यांचा अहवाल विचारात घेण्याजोगा होता. श्री. शिवदासानी यांची असा अहवाल सादर करण्याकरतां नियुक्ति केली होती. त्यानी आपल्या अहवालात या अनुषंगाने २२६ चौरस मैलांच्या जंगलाचा विनियोग करण्याची योजना जी सूचवली होती ती मंजूर झाली होती. सपाट जमीन भात शेतीकरता, उतरणीवरची (Terraced paddy cultivation) भात शेतीस्तव, उंचीवरची निसरडी जमीन फळे, भाज्या आणि घरगुति जनावरांच्या चरण्याकरता नारळीच्या शेतीकरता एक अनुकूल पट्टा. याबाबतीत अनुमानित वाटपाची पद्धत अशी होती कीं, ज्यांचे पुनर्वसन करावयाचे त्यास प्रत्येकी सपाटीवरची पांच एकराची आणि उतरणीवरची पांच एकराची जमीन द्यावयाची. एक तपशील महत्वाचा तो असा की, नारळीचे पीक हे मोसमाला येणारे नसून तुलनेने दीर्घकालीन असते. कारण ते सात वर्षानें फळास येते. तेव्हां ह्या सात

वर्षाच्या अवधींत जो नारळाची शेती करतो त्यास उपजीविके-करता पर्याय हवा. अर्थात बंगाल, मद्रास किंवा केरळ येथील माणसाने सात वर्षे वाट पाहत बसावे असे अपेक्षिणे गैरच झाले असते. याला आणखीन् एक पर्याय होता तो असा कीं, नारळीच्या शेतीकरता मद्रास, पश्चिम बंगाल आणि केरळ येथील भूमीहीनांना पाचारण करावयाचे. मी त्याप्रमाणें योजना आखावयाची ठरवले. पुनर्वसन व्हावे, उत्पादन वाढावे आणि वसवलेल्या माणसांचा उदरनिर्वाह समाधानाने होत होत उत्कर्ष साधला जावा...जे जे करावयाचे ते केल्याखेरीज राहायचे नाहीं, सोडावयाचे नाही असे मनाने घेतले. येथे याचे एक विशेष उदाहरण देणें मोठे उद्‌बोधक ठरेल. इ. स. १९५८ च्या डिसेम्बर-रात मद्रास सरकारला कळवलं कीं, सिलोनी भारतीय तामीळांना (जे भारतात परत पाठवले जात होते) अंदमानातील बेटांत वसवणे शक्य, सोयीस्कर आणि लाभदायक. लोकसंख्या कमी आणि रबर, नारळी भाताच्या लागवडीकरता विपुल जमीन हा योग कुणालाहि मोहविणारच. आजचे भारतीय कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. कामराज नाडर हे त्यावेळेस मद्रासचे मुख्य मंत्री होते. श्री. नाडरना हे सूचवण्यांत प्रयोजन असं कीं, ही भारतीय मंडळी या उद्योगधंद्याशी (Plantation) निगडीत होती आणि त्याना वसवण केव्हांहि फलदायक ठरेल ही आशा निराधार वा वृथा कशी ठरेल ? या सूचनेप्रमाणें अंदमानचे माजी उपकमिशनर श्री. ए. जी. राजाराम यांच्या नेतृत्वाखाली पाहणी करण्यास्तव तीन अधिकाऱ्यांच्या एका मंडळाने बेटांना भेट द्या द्यावी असे ठरलें. त्यानी आढावा घ्यावा आणि देऊं केलेल्या जमीनीचा पुनर्वसतीच्या दृष्टीने साक्षेप करावा असा संकेत होता. हे मंडळ पुढे इ. स १९६० च्या मार्च महिन्यात भेट देऊन गेले...

अंदमानचे मूळचे अधिवासी म्हणजे आदिवासी. त्यांचा वावर व वस्ती कांहीं अधिक नाही. नागरी जीवनांत ते अभावानेच तळपत असल्याचे दिसून येत होते. या अंदमानी आदिवासींची संख्या दिवसेंदिवस कमी होत चालली होती. इ. स. १९५१ च्या आरंभी त्यांची एकूण संख्या जास्तीत जास्त ७५० असावी असा कयास होता. म्हणजे ही घसरण २५००–३००० वरून अशी रोडावली होती. आधुनिक संस्कृति आणि सुधारणा यांच्यांत ही माणसे बसूं व जगू शकत नाहीत. त्यांच्या स्वच्छंद आणि निसर्गपूत जीवनाला सुधारलेल्या संस्कृतीपुढे टिकाव धरता आलेला नाहीं. उलट सुधारलेल्या संस्कृतीची पुरोगामी पाऊलें या लोकांच्या दृष्टीने आक्रमणाची ठरली असून ही आदिवासी माणसे अशा जीवनाशी समव-स्थापन करण्यांत असमर्थ आणि अपयशी ठरली आहेत. या अंदमानी आदिवासींच्या बारापैकी दोन जाती मुख्यत्वें माझ्या निदर्शनास आल्या. ओंगी आणि जारवा. नारळ, मध आणि मासे हें त्यांचे खाणे आणि 'टोकोई बुईया' नावाचे घर त्यांच्या निवासाचे ठिकाण झोपडीवजा घुमटासारखे. असे त्यांचे जगणे. त्याना भात खाऊ घातला तर अतिसार झाल्याची उदःहरणे



मी–आम्ही–रमलो–रंगलो

होती. यांचा विवेचनपरत्वें तपशील पुढें येणार आहे म्हणून त्याची चर्चा येथें करत नाही.

**व्यक्ति आणि नेतृत्व**

अंदमानच्यावस्तीचा संबंध तिथे इ. स. १८५७ च्या बंडाळी (स्वातंत्र्य समर–पहिले) नंतर इंग्रजानी घडलेल्या हद्दपारीच्या आणि जन्मठेपेच्या गुन्हेगारांशी (कैद्यांच्या) आहे. आजची बहुतेक आणि मूख्यत्वें वस्ती कैद्यांच्या वंशजांची आहे. हे मूळांत भारतातील एकाच विभागातून आलेले नव्हते. किंबहुना भारतातील सर्व प्रांतातून ते आले होते. पाठवले गेले होते. दिवसामागून दिवस आणि वर्षामागून वर्षे गेली आणि ही माणसे तिथेच अडकली. संस्कृति, स्वातंत्र्य आणि सुधारणा यापासून कितीतरी दिवस दूर राहिली. वंचित राहिली. शापीत राहिली. अप्रगत राहिली.

या पार्श्वभूमिमुळें ती माणसे सकुंचित वृत्तीची आणि कोत्या मनाची तर झाली नाहीत ना अशी शंका वरचेवर येत होती. मात्र कांहीं माणसे विशेष वाटली. पुढेहि ती लक्षणीय ठरली. कारण त्यांच्यांत नेतृत्वाचे गुण होते. पैकीं के. रत्नम यांचे नाव प्रथम घ्यावे लागेल. हे गृहस्थ साठी ओलांडलेले होते तरी उत्साही होते. अंदमान इन्डियन असोशियशनचे आणि अंदमान कॉंग्रेसचे त्यावेळचे अध्यक्ष होते. यांचे वडील परीट जातीचे आणि बेटावर गुन्हेगार म्हणून आले. रत्नम यांच्या जीवनाचे वळण प्रथमपासून बदलले. त्यांचे शिक्षण हिन्दीतून झालेले

आणि तीच त्यांची मातृभाषा होती. कारकूनीत शिरले आणि हेड क्लार्क म्हणून निवृत्त झाले. निवृत्तिनंतर कामगार चळवळींत अधिक लक्ष घातले. शहरातील मजूर यांच्या नेतृत्व आणि नियंत्रणाखाली आले. ज्याला समसमा संयोग म्हणतात तो असा कीं, रत्नम यांचा मुलगा के. आर. गणेश कामगार पुढारीच जणु निपजला. मुलाने गुजराथी कूळ असलेल्या मुलीशीं लग्न केले. विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे अंदमान सारख्या एक अर्थी परित्यक्त आणि दूरस्थ ठिकाणीं हे पितापुत्र हिन्दीचा निर्भेळ आणि निष्ठावान् पुरस्कार करणारे हिन्दी प्रेमी होते. गणेशला पुढारीपणाचे आणि नेतृत्वाचे प्राथमिक व प्रात्यक्षिकाचे घडे जरी आपल्या बापाच्या तालमीत मिळाले तरी त्याच्यापुढे जाण्याची क्षमता आणि धमक त्याच्यांत असल्याचे मला जे सुरुवातीला भासले ते पुढे खरें ठरले. या गणेशमध्ये अनिष्ठ प्रथांना राजकीय शह देण्याची कुवत होती.

—दुसरे गृहस्थ निरंजनलाल. हेहि गुन्हेगारांच्या वंशावळीतलेच. अंदमान कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. विधायक विचाराचे वाटले. खानसाहेब फरजंद अली ही ऐशी वर्षाची आणि सधन



अधिकार ग्रहणानंतरचा संकेत

व्यक्ति माझे लक्ष वेधून जी राहिली तिचे कारण यांचा वारस जो पुतण्या अफताब होता तो उत्तम खेळाडू होता. क्रीडा व तत्सम क्षेत्रात त्याचा उपयोग होण्यासारखा होता. त्या मागास विभागात निरनिराळ्या क्षेत्रांत उपयोगी पडेल अशा नेतृत्वाचा शोध माझी नजर घेत होती. हे पहिले अंदाज जे करत होतो ते फारसे चुकले नाहींत. शिवाय वयोवृद्ध फरजंद अलीसारख्या आदरणीय व्यक्तीचा पुतण्या होता तो.

—याच अवधीत एक प्रसिद्ध वर्मी व्यापारी अू–सॉ–म्या भेटावयास आला. एका क्षणांत आणि एका दृष्टीच्या फेकीत हे प्रकरण वेगळे असल्याचे खटकले. या व्यक्तीच्या भोवती संशयाचे धुकें पसरल्याचा भास झाला. वास्तविक दुर्गाप्रसादबद्दल तसे वाटले असते तर एक वेळ कळण्यासारखे होते. कारण दुर्गाप्रसाद हा असिस्टंट कमिशनर ऑफ फॉरेस्ट असला आणि मूळचा तेथील इतर लोकांच्याप्रमाणे गुन्हेगारांच्या वंशावळीतला होता तरी अंदमानवर इ. स. १९४२ साली जापान्यांच्या आक्रमणापूर्वी हाच एक अधिकारी पळता पळता टिकला आणि त्याला ब्रिटिशानी खात्याचा मूल्य करून ठेवला. इ. स. १९४५ साली इंग्रज परत आले तेव्हां तो निवृत्त झाला. तोहि अंदमान इंडियन असोशिएशनचा सदस्य झाला. पण याची जरी प्रथम पासून व्यावसायिक दृष्टी होती तरी दडवण्यासारखे कांही नव्हते. तो तेथील पहिला स्थानिक गुत्तेदार झाला, छोटी छोटी कामें घेऊन थोडाबहुत पैसा त्याने गाठी बांधला. दुसरे आणखीन एक गृहस्थ म्हणजे लक्ष्मणसिंग. हे इ. स. १८५७ च्या बंडखोरांच्या वशंजापैकी असावेत. हे १९६१ पर्यंत लोकसभेचे सभासद म्हणून नियुक्त होते. वागणुकीने सौजन्यशील आणि आकर्षक. व्यापारी होते पण पत संभाळून होते. आदरले जात होते.

## गुन्हा न करणारी माणसं

असं मी चार्ज घेण्याच्या अगोदर कांही वेधलं. माणसं आणि गाव पाहिलं. पाहत होतो. मिळेल ती आणि मिळाली ती आणि हवी ती माहिती प्राप्त करून पार्श्वभूमि तयार करत होतो. जी माणसं भेटली आणि बोलली त्यावरून एक विशेष लक्षांत आला कीं, अंदमानांत वर्णभेद नव्हता. वर्णभेद नव्हता म्हणून अस्पृश्यहि नव्हते. आणि अस्पृश्यता नव्हती म्हणून सामाजिक विषमताहि नव्हती. भाषा हिन्दी होती. अर्थात् आदिवासींची त्यांची बोली होती. अंदमान वासियात आपण दूरस्थ झालो आहोत यावरोबरच आपल्याकडे कुणाचे फारसे लक्ष जात नाही अशी अपरोक्षपणे एक न्यूनत्वाची भावना होती. एक कळलं आणि जाणवलं ते असं कीं, वाईटातून केव्हां केव्हां चांगलं निघतं म्हणतात ते असे कीं, गुन्हेगारांना जे ह्या बेटावर पाठवलं ते कायमचं. त्यांत जात एकच. ललाटी येथे येणे लिहिले होते. परिणामतः ते सर्व एक होत गेले. प्रवासात (विशेषतः यात्रेत), आजारात आणि शिक्षा भोगताना माणसे भेदभाव व अहंभाव विसरतात किंवा गौण करतात. पण प्रवासातले आणि आजारांतले ऐक्य क्षणिक म्हणजे त्या त्या समयापुरते असते. जन्मठेपेची आणि हद्दपारीची शिक्षा म्हणजे मनुष्याच्या जीवनाचा परिसर, पर्व आणि धैर्य बदलून टाकणारी ठरते. माणसे समदुःखी होतात. अंदमानातली माणसे म्हणूनच एक झाली. एक राहिली. अर्थात अशा इतिहासामुळें मायभूमी भारतांत (Mainland) एक जो समाजाचा घटक प्रांतोप्रांती दिसतो त्याचा अभाव अंदमानात जाणवण्याइतका होता. हा घटक म्हणजे आपल्या समाजाचा अविभाज्य घटक मध्यमवर्ग होय. त्याचबरोबर ती माणसं पाहताना असं खटकलं कीं, एकदां गुन्हेगार म्हणून येथे आलेल्या माणसांच्या आणि त्यांच्या वंशजांच्या जीवनावर एक जी काळी छाया पसरली तिचा परिणाम म्हणून असेल कदाचित पण न्यूनत्वाची भावना होती ती स्पृहणीय नव्हती. आणखीन जे ध्यानांत आलं ते असं कीं, अंदमानात वेडा नव्हता. लोकांच्या मनाच्या एकजात निरोगीपणाचे हे लक्षण उत्तेजक व उत्साहक होते. तिथे चोरी चपाटीचा गुन्हा नव्हता. होत नव्हता. अगदीं घरांत उघड्यावर शंभराची नोट (किंवा नोटा) ठेवल्यास किंवा

अनुक्रमणिका

असल्यास झाडलोट करणारा ती नोट बाजूला सारून झाडलोट करायचा. नोट परत जागेवर ठेवून जायचा. तेथील वैयक्तिक आणि सामाजिक जीवनातील ही 'आचारसंहिता' वाखाणणीय नाही असे कोण म्हणेल ? त्याचा उपयोग रचनात्मक कार्यास अनुकूलरीत्या होण्याची आशा यामुळे दुरावली. पण त्या बरोबरच जाणवले कीं, कसले तरी असाधारण, अपूर्व करण्याचे वेडहि कुणाला नव्हते. नको ते वेड नव्हते ही समाधानाची तर हवे ते वेड नव्हते ही असमाधानाची गोष्ट मात्र अस्वस्थ करणारी होती.

## अधिकार ग्रहण

ठरल्याप्रमाणे मी ता. १४-८-५८ ला सकाळी १० वाजता शपथ घेतली. दुसऱ्या दिवशी स्वातंत्र्य दिन (१५ ऑगस्ट) होता. तो साजरा झाला. मानवंदना झाली. तिरंगी झेंडयास सलाम केला. सकाळच्या प्रसन्न वातावरणात सळसळणाऱ्या वाऱ्यामुळें फडफडणारा तिरंगी झेंडा आणि अशोक चक्र मला खुणावत होते.... शांतीच्या सूत्रांत तिन्ही रंग गोवायचे आणि प्रगतीचे चक्र अव्याहत चालू ठेवायचे – सिंह धडाडीने आणि चपळाईने.. बऱ्याच वेळा समोरच असते. उघड दिसते. नेहमीच पाहतो. सर्व. गृहित धरतो. अशांतच संवेदना आणि सूक्ष्मता बधिरते. आणि केव्हां केव्हां विशिष्ठ प्रसंगी आशय एकदम प्रकट झाल्याचा साक्षात्कार होतो तो असा...!

## कल करेसो आज कर
## आज करे सो अब कर

उपचार झाले. शुभदिनाचे पार्श्वभूमिवर अधिकारग्रहण झाले होते. मी आराखडे आखत होतो...काय काय करायचे? कागदावर कांहीं लिहावयास सुरवात केली:–

लोकांना कांहीतरी नवीन आहे असं वाटावयास लावलं पाहिजे...

—तसं वाटवयास कांहीं तरी करण्याजोगं आहे असं त्यांना जाणवलं पाहिजे.

असं जाणवण्यासारखं ?

कुठून सुरवात ?
कशी सुरवात?
सगळेच महत्वाचे
कोणतेच गौण नाही,

शिक्षण
जगाशीं संपर्क
उत्पादनांत वाढ
उत्पान्नांत भर
सात्मीकरण
वाहतूक
टपाल
वाचनालय

योजना आखलेली होती. योजना हाच तरुणोपाय होता. आदर्श आणि व्यवहार, स्वप्न आणि वास्तव यांचा सुवर्णमध्य योजनेनेच दृष्टीपथात येणारा. पैशाची चिंता नव्हती. काळजी होती ती खर्च करावयाची. सहा कोटींची तरतूद होती. पूर्वी अडीच वर्षात फक्त २७ लाख खर्च झाले होते. काम करत जाऊं तसं तसं कळत जाईल

असा एक विचार सोईस्कर आणि मोहक वाटला. पण तो मनाला खिळवून ठेवूं शकला नाही. अंगिकृत कर्मं केवळ दैवयोगावर विसंवून राहिले तर खोळंबतेच असे नव्हे, तर विशुद्ध स्वरूपात साकारतच नाही. जीवनोपयोगी आणि समाजउपयोगी घटकांचा सांधा असा बेमालूम जुळला व जमला पाहिजे की राष्ट्रहित आणि मानव-कल्याण ही निव्वळ ध्येयवाद्यांचीच मिरासदारी वाटूं नये. ठरूं नये. वेगवेगळ्या उघड दिसत असलेल्या उणीवा आणि अपरिहार्य असलेल्या सुधारणा यांच्या सीमारेषा हेरुन एक एक योजना घेतली आणि कामास सुरवात केली तर ? एक अडचण लक्षांत आली कीं, आरंभ केला आणि जरुर त्या पैशाच्या मंजूरीच्या अभावी कामे रेंगाळली किंवा अडखळली तर ? – प्रत्येक बाबतींत एका विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे मंजूरीकरता वाट पाहावीच लागणार ? ही मर्यादाच वाढवून घेतली तर ?–पदोपदीं वाट पाहण्याची किंवा अडण्याची भीति भेडसावणार नाही. कामास ऑक्टोबरात सुरवात होते. मोसम अनुकूल असल्याने गति येते आणि आणताहि येते. सरकारच्या निदर्शनास ही वस्तुस्थिति आणली आणि मुख्य कमिश्नरांना अधिक खर्च करण्याचे अधिकार दिल्यास कामें लवकर



**शिक्षणाचा प्रपंच–पसारा वाढवायचा होता**

उरकून घेण्यास आणि योजनांचे लक्ष (Target) गाठण्यास ते उपयोगी पडेल असे सप्टेंबर १९५८ महिन्यांत ( चार्ज घेतलेल्या वर्षीच)च कळवले. त्याप्रमाणे कामास लागलो होतो. मुख्य कमिश्नराचे पद आणि काम ही व्यक्ति निरपेक्ष असल्याने त्या पदास पूरक अशा तर्कशुद्ध सूचना साधार सादर केल्यास त्याचा कोणत्याहि पातळीवर टेकू देणारा विचार व्हावयास प्रत्यवाय नसतो असा माझा कयास आणि विश्वास होता कारण स्वतः तसा कांहीं बाबतीत वरच्या पातळीवर काम केल्याचा अनुभव होता. ज्या महामना कै. पंडित पंताची मजसारख्या वयाने (तुलनेनें) लहान अधिकाऱ्यास मुख्य कमिश्नर–२ पदीं नियुक्त करण्याची योजकता होती ते पंत कांहीं कल्याणकारी आणि विधायक सूचवल्यास त्याला केवळ आपला आशीर्वाद देणार नाहीत तर सूचना कार्यान्वित होण्याच्या दृष्टीने अभय देतील याचा मला विश्वास होता. आपण चांगलं करत गेल्यास हा मोठा 'पुरुष' आपल्या पाठीशीं आहे हा विश्वास माझ्या धारणेला, धोरणाला आणि कामाला प्रेरणा व चालना देणारा होता आणि याच आधारावर मला जादा अधिकार प्रदान करण्यात अडचणी उद्भवणार नाहीत वाटलं. आणि माझा कयास आणि विश्वास अनाठायीं ठरला नाहीं. विनंतीला अनुसरून मध्यवर्ती सरकारच्या विनामंजूरी १०००० वरून पाच लक्ष पर्यंत खर्च करण्याची अनुज्ञा मिळाली. अनुमति प्राप्त झाली. इतकें करूनहि त्या योजनेच्या व मर्यादेच्या काळात चार कोटींचाच विनियोग होईल हेहि कळवून ठेवले होते. प्रगतीची गति कितीहि वाढवली तरी विकासाच्या क्रमाला जो स्वाभाविक अवधि लागतो तो कांहीं मूळांत अफरातफर करून कमी करता येत नाही हेच या सावधगिरीमागील कारण होते.

## लोकशाहीचे बाहु

म्हणजे करायचे तरी काय होते ? लोकशाहीत कोणत्याहि शासकाचे दोन विशाल बाहू असतातः एक त्याच्या हाता खालील शासन यंत्र आणि दुसरा म्हणजे लोकांचे सहकार्य. या दोन बाहूंचे समाज आणि राष्ट्रहिताकरता एकत्र येणे जितकें वाढत जाते तितके सर्वकल्याण आकारत आणि साकारात जाते. माझ्या तात्काळ लक्षांत आले कीं, ज्यांत तात्काळ बदल आणि सुधारणा हवी होती त्याची सुरवात शासन यंत्रणेपासूनच करावी लागणार होती. शासनाबद्दल सर्वसाधारण नागरिकाला आपुलकी वाटायची तर शासनाला कांहीं बाबतींत आणि कांहीं अंशी एकदरींत ठरवलेल्या व अनुमानित तत्त्व व धोरणाला अनुसरून जसे लोकाभिमुख तसेंच लोकानुगामी पाऊल उचलणे आवश्यक असते. असें करायचे म्हणजे शासनाचा व्याप आणि कुवत अशी जबावदारी समर्थपणे पेलण्याइतकी वाढवणे व क्षम करणे हे प्रथम लक्ष्य ठरत होते. मुख्य कमिशनराची अधिकार-कक्षा आर्थिक, आरोग्यविषयक, बंदर व नाविक सुधारणा, वास्तु, कायदा आणि सुरक्षा व शांतता, इमारती, दळणवळण, वनविभागाची अंगोपांगे, शिक्षण इ. इ. क्षेत्रांना अंकित करून होती. निरनिराळ्या खात्यांत आदेशित वेगवेगळ्या जबाबदारीची कामें करावयास ती ती माणसें हव्या त्या प्रमाणात असली कीं कामाची विभागणी योग्य रितीने होऊन कामे अपेक्षेप्रमाणे तडीस जाऊ शकतात. हे पहिले पाऊल म्हणून उचलायचे ठरवले आणि त्याप्रमाणे ज्या जागा रिकाम्या होत्या त्या भरून काढल्या. आवश्यक वाटल्या तेथें फेर तपासणी-प्रमाणे नवी विभागणी करून नव्या जागाहि निर्माण केल्या आणि त्याहि भरल्या तसें करताना स्थानिक गुणवत्ता, लायकी आणि उत्साह याना अवसर दिला. बाहेरच्या माणसाकरताच बढतीच्या जागा असा का एकदा ग्रह झाला म्हणजे नियमाने कर्तव्यें पार पडतात पण त्यांत एक प्रकारची अनास्था व परकेपणा ही शिरतात आणि कामाला कळा प्राप्त होत नाही. या उलट लायकीचा आणि गुणवत्तेचा स्थान सापेक्ष आणि व्यक्तिनिरपेक्ष विवेक केला आणि त्याप्रमाणें नेमणूका झाल्या म्हणजे व्यक्ति मत्वातीला आस्था आणि उत्साह ही उत्तेजक शक्ति बनून कामाचा उरक व गति आश्चर्य वाटल्यासारखी वाढते. 'छेः, हे आपल्या नशीबीं नाही हा समज स्थानिक सेवक व

अधिकारी वर्गातील योग्य त्या माणसांची निवड व नियुक्ति केल्यानेच जाणार होता. तसे केले. त्यांच्या मनावरचे दडपण गेले. आपण वंचित आहो ही भावना विरावयास मदत झाली. माणसाची अस्मिता आपल्याकरता आणि आपल्या प्रदेशाकरता कांहीं तरी विधायक आपण करत आहो अशा उच्च विचाराशी समीकरण साधून कर्मयोगी बनते. नैतिक बळ अशा कामाची प्रेरणा होते. क्रमप्राप्त म्हणून आणि पोटाकरिता म्हणूनच रखडावे लागत आहे अशी रखडण्याची भावना राहत नाही. आपण करतो ते महत्वाचे आहे आणि जी कांहीं रचना-पुनर्रचना होत आहे त्यात आपला वाटा आहे याने मान वाढतो, आणि मान उंचावते. कामाची शानहि वाढते. याचा परिणामहि मला दिसावयास वेळ लागला नाही....

## जुने जाऊं दे, नवे येऊ दे

शासनाच्या समस्ये इतकीच महत्वाची आणि शासनाचा जनसंपर्क विचारात घेता जवळची समस्या म्हणजे जुन्या कालाबाह्य कायद्यांच्या जागी नवे कायदे आणणे आणि जिथें कायदे कालबाह्य नव्हते तिथें त्यांच्यात आवश्यक त्या सुधारणा करणे. उदःहरणार्थ असं निदर्शनास आलं (आणि ते खरंहि होतं) कीं, प्रत्येकाला शेती होती पण शेतीची मालकी नव्हती (No rights of occupancy). सर्वसाधारण नागरिकास नगराच्या जीवनांत आपला वाटा आहे असें वाटावयास लावणारी नगर पालिका नव्हती. नागर जीवनाची या अनुषंगाने जी जागरूकता आणि संस्कारिता असते तिचे वळण तेथील जीवनाला लागणे आवश्यक होते. आजच्या आपल्या सामाजिक आणि आर्थिक जीवनाच्या बैठकीवर नगर पालिकेचा संभव तारक म्हटल्यास ते अतिरंजित ठरू नये. एकदां ती संभवली म्हणजे अक्षरशः तपामागून तपे तारून आणि सुधारून नेते. अर्थात् सर्व चांगल्या गोष्टी प्रमाणेच तिला वांच्छित आणि आकांक्षित कार्यक्रमाकरता योग्य रीत्या वापरता आणि राबवता आले पाहिजे.

नगरपालिका अस्तित्वात यायची म्हणजे मग तशी तिची कार्यतत्पर आणि कायरत असणारी यंत्रणा निर्माण करणे ओघानेंच आले. एकदा ठरवले कीं, हा लोकशाहीचा आविष्कार झालाच पाहिजे तेव्हां पाऊल मागें घेणें शक्यच नव्हते. नगर पालिकेच्या कामाकरता कुणीतरी अनुभवी व्यवस्थापक शासक हवा होता. तसे प्रयत्न सुरू झाले. लायक माणसें कुणी सोडावयास तयार नसते. दुसरें असें कीं, अंदमान सारख्या दूरच्या ठिकाणीं कुणी जावयास धजावत नसे. पुण्याचे एक श्री. ए. एस. कुळकर्णी (पुण्याच्या नगर पालिकेचा अनुभव असलेले) यांचे नांव आले. क्षणभर मनांत आले कीं, पुण्याचा माणूस एकवेळ अंदमानांत आला तरी राहील आणि टिकेल कां ? निर्णय घ्यावयाचा आणि कामाचा आरंभ करावयाचा होता. श्री. कुळकर्णी यांची सचीव म्हणून नियुक्ति केली. त्यानी चांगली कामगिरी बजावली. नगरपालिकेची अंदमानच्या पहिल्या निवडणुकीची फेर झडली होती. पण काम मार्गस्थ झाले नव्हते. मतदान झालं चांगलं. लोकजीवनात एका अभूतपूर्व जाणीवेचे वारें खेळू आणि वाहू लागले. पहिल्या निवडणूकीत अंदमान कॉंग्रेस विजयी झाली. गणेश दोन जागांवर निवडून आले. दोन निवडणूका झाल्या. पहिला उपाध्यक्ष रत्नम अणि दुसरा गणेश झाला. नगर पालिके करवी पहिली समस्या पाण्याची सोडवण्यांत आली. नळांची सोय आणि पाण्याचा साठा करण्याकरिता टाक्या निर्माण करणे यांची अंमलबजावणीहि झाली. माणसांच्या आणि रहदारींच्या रस्त्यात सुधारणा केली. नगर पालिकेचा अध्यक्ष डेप्यूटी कमिश्नर असतो याचा उल्लेख या ठिकाणीं अनाठायीं किंवा अप्रस्तुत ठरू नये.

## लोकशिक्षण

शिक्षणाचे लोण सर्वव्यापी, सर्वस्पर्शी आणि जीवनदर्शी करावयाचे होते. शिक्षण हे आधुनिक मानवाचे वरदान आहे हे अंदमानसारख्या मागास भागात अधिक यथार्थतेने कळून येणारे होते. शिक्षण माणसाला कसे स्वयंपूर्ण-स्वातंत्र्यशील आणि समर्थ करते हे एकदा कळले, उमजले कीं, शिक्षणाची चटक लागते. योजना आणि सुधारणा यांची निकड मग पटवावी लागत नाही. या दृष्टीने शिक्षण सर्व थरातून न्यायचे आणि खेळावायचे होते. कांहींच झाले नव्हते अशांतला भाग नव्हे. मी गेलो तेव्हां एकंदरीत ४८ शाळा, १३१ मास्तर आणि ३५१६ विद्यार्थी असा शिक्षणाचा प्रपंच होता. या प्रपंचाचा पसारा



अंदमानचा आधुनिक 'गजराज' ट्रॅक्टर

वाढवावयाचा होता. त्या पसाऱ्याचा मनोरम पिसारा करावयाचा होता. उदित झालेल्या आणि उगवणाऱ्या पिढीतून मानवी भाग्याचे शिल्पकार निर्माण व्हायचे असतील तर त्याना शारिरीक व बौद्धिक, मानसिक आणि नैतिक विकासाची सर्व माध्यमं व साधनं सहज प्राप्य करून देणे जरूर होतं. संस्कृतीच्या देण्याला अंदमानकर अपवाद नसून त्यांचाहि त्यावर तेवढाच हक्क आहे ही भावना रुजावयास याने मदत होणार होती. या दृष्टीने शाळा वाढवणे, योग्य शिक्षकांची निवड करणे, व्यावसायिक आणि तांत्रिक शिक्षण योजणे यांच्यावर भर द्यावयाचे ठरवले. ठरवल्याप्रमाणे कामास सुरवात केली. यांत आणखीन् एक हेतु असा होता कीं जी माणसें पुनर्वसनाकरता येत होती त्यांना अंदमान कोणत्याहि बाबतीत कमी किंवा उणे सहजासहजीं वाटू नये. एक वर्षा-सव्वा वर्षात ७९ शाळा, १८५ मास्तर

आणि पांच हजाराच्यावर विद्यार्थी असा पल्ला मारला. एक उल्लेखनीय गोष्ट अशी कीं मास्तरांची व शाळांची केवळ संख्या वाढवल्याने शिक्षणाचा दर्जा ऊंचावत आणि भारदस्त होत नाही. त्याला चांगले शिक्षक लागतात. या बाबतीत मी व्यक्तिशः जे लक्ष घातले ते असें कीं, लखनौ, दिल्ली, कलकत्ता, मद्रास इ. ठिकाणच्या व्यक्तींच्या आणि अर्जदारांच्या यादीतून मी स्वतः शिक्षकांची निवड केली. या सर्वांतून चांगले ते निवडले आणि अंदमानच्या शैक्षणिक जीवनांत यामुळे जे स्फूर्तीचे वातावरण निर्माण झाले ते मला प्रत्यक्ष पाहावयास मिळाले हे माझे भाग्य मानतो.

**आधुनिक गजराज**

पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे अंदमान बेटांत नवी वसती बसवायची होती. त्याकरता योजकतेनें आणि सावधान राहून कांहीं जंगलांचा भाग deforest करायचा होता. जंगल हे तर अंदमानचे वैभव होते. संपत्ति होती. ती घालवून किंवा तिच्यांत भर न घालता कोणतीही सुधारणाही वांझोटीच ठरली असती. अंदमान येथील जंगलांतील लाकूड हे रेल्वेच्या स्लिपर्स करता, आगपेटचांच्या करता आणि इतर महत्त्वाच्या अनेक उद्योग व्यवसायाकरता अतिशय उपयुक्त आहे. उंच आणि प्रचंड वृक्षांची खानदानी 'घराणी' शाबूत ठेवणे आणि त्यांची वृद्धि करणे म्हणूनच आमच्या कार्यक्रमाचा एक भाग होते.अंदमान बेटात गर्जन, पडाउक, बादाम, धवल-धूप, पापिता, शुभ्र चुग्लम, कोको, मार्बलवुड, आणि चुई या प्रकारची झाडे विपुल प्रमाणात होती व आहेत. अजमासे ६०,००० टन लाकूड दरवर्षी तेथील जंगलातून निप्पन्न होते. लाकूड हलवणे गजराजाच्यावर अवलंबून होते. पण गजराजांची संख्या अपूरी होती. कमी पडत होती. तेव्हां ट्रॅक्टरचा वापर केला. गजराजाच्या तोडीस तोड ट्रॅक्टर पाहून असेहि वाटले कीं घोडयाच्या वाहनावर विसंबणाऱ्या मानवास आगगाडी मिळताच त्यानी त्या वाहनाला Iron Horse म्हटले तसें ट्रॅक्टरला आधुनिक गजराज कां म्हणू नये ?

**वाचाशक्तीचे उन्नयन**

थोडया दिवसाचा आतच उघडपणे दिसलं को लोकांचा बराचसा उत्साह आणि दम चकाटचा पिटण्यांत व कंडया उठवण्यांत खर्च होत होता. वाया जात होता. पोर्ट ब्लेअरच्या ॲबर्डीन बाजारातील चौरसरस्त्यावर क्लॉक टॉवर आहे तेथें माणसें जमत. 'कंपू' होत. त्या तीन महान माकडांचा साऱ्यानाच विसर पडे. मग 'ती न माकडे' आणि कोण माकडे असा सवाल पडे. तेथून अफवा व बातम्या पिकतात आणि पसरतात असा प्रवाद होता. तो अतिरंजित किंवा अनाठायी नव्हता. सामाजिक मानसशास्त्रानुसार गप्पा मारणे आणि हवेत वार्ता सोडणे हा एक करमणूकीचा प्रकार. तो वाईट किंवा चांगला हा वळण लावण्याचा आणि लावून घेण्याचा भाग असतो. लोकांना एकमेकाविषयीं जाणण्याचे कुतुहल असते. माणूस म्हणून संबंधित आणि अनुषंगिक माहिती करुन घेण्याची जिज्ञासा असते. मनुष्य सदा आपले चांगल्याशी समीकरण (Identification) आणि वाईटाशी विभक्तिकरण (Disassociation) कल्पिण्यांत सुख मानत असतो. त्याच्या स्वभावाच्या हेव्यादाव्यांचे आणि आवडी निवडींचे प्रक्षेपण (Projection) आणि आविष्करण अशा मानसिक बैठकीतून उद्‌भवतें. म्हणून त्याच्या वैयक्तिक आणि सामाजिक आस्थेला कांहीं चांगले माध्यम, खिळवून ठेवणारें साधन, आणि योग्य दिशा लाभणारा आधार मिळाला तर कंडचांची 'चर्चा' बनते, अफवांच्या बातम्या होतात आणि चकाटचांना संभापण आणि संवादाचे स्वरूप येऊं शकते. माणसांच्या भेटीला यामुळे कांहीं दर्जा प्राप्त होतो, बोलण्याला नोंद घेण्यासारखे वजन येते आणि 'अधमाची यारी । रंगपतंगाच्या परी' वाटूं लागते. माणसाचा सामाजिक विकास ध्यानांत घेता नेहमी या करता प्रयत्न झालेले दिसतात. अगदीं खेडचांतली 'चावडी' नावाची संस्थाच बनली. देऊळे, सभामंडप इ. इ. ठिकाणीं भेटण्यात प्रयोजन होते. त्या प्रयोजनांत सामाजिक धारणेचें सूत्र होतें. अंदमान येथें असं कांहीं तरी आणणं, निर्माण करणं जरूर होतें. मायभूमिपासून दूर असलेलीं ती माणसें दूर फेकले गेलेलो आहोत या खंतीने पोखरली होतीच. त्यांत वाचाशक्तीचा अनिष्ठ आणि अनधिकृत सुकाळ सांस्कृतिक दुष्काळ पेरणारा होता. भारतीय जीवनाच्या विभिन्नतेत एक सांस्कृतिक अभिन्नत्व आहे. अनेकांत एकत्व आहे. विविधतेत एक रम्यत्व आहे. त्याचा मुलामा अंदमान येथील सामाजिक जीवनाला देण्याची अत्यंत गरज होती. अविश्वासाचे वातावरण काढून टाकायचे होते. जातिविरहित तेथल्या समाजात असें कांहीं केल्यास तेथील समाज, कुणी सांगावे ? एके दिवशी आदर्श बनावयाचा.

— या पार्श्वभूमिवर मला असं तीव्रतेनं वाटलें कीं, तेथील लोकांना भारताच्या आणि जगाच्या वार्ता कळल्या आणि त्यांचे वर्तमान भारतांत आणि जगांत वर्तले तर ? अंतर नाहीसे होईल. अंदमानाबद्दल बाहेरच्यांना आणि बाहेरच्याबद्दल अंदमानियांना विशेष माहिती नव्हती. संपर्क नव्हता. संपर्काने सामिप्य येते. सामिप्याने साधर्म्य वाढते. समानधर्म कळला कीं जवळीक येते आणि जवळकींत सहानुभव आणि परानुभव यांच्या सीमा नाहीशा होतात. 'वार्तावार्ता' असें शब्द माझ्या मानस आकाशांत निनादले. अंदमान येथील लोकांना वार्ता कळल्या, कळवल्या आणि ऐकवल्या तर त्यांचे गप्पासप्पांचे 'रूप' बदलणे शक्य होते. रूपाचे 'स्वरूप' होणे मग कठिण राहिले नसते. गप्पाना आशय आणि दिशा लाभणे अव्यवहार्य ठरले नसते. विचारांची चक्रें शेवटी 'वर्तमान पत्र' या स्वीच जवळ आणि 'आकाशवाणी'च्या वेव्हलेंग्थ भोवती घोटाळू लागली.

— अंदमानचं एक सरकारी बुलेटीन निघत असे. त्याच्यांत माहिती देण्याचे सत्र सुरू केले तर ? पण माहिती मिळवायची कशी ? त्याकरता ऑल इंडिया रेडिओच्या अधिकृत व खास बातमीदार म्हणून माझी नेमणूक करून घेतली. तारा आणि अन्य सहज साध्य मार्ग अवलंबिले आणि हा उपक्रम समूर्त केला. येथेंच थांबून चैन पडण्यासारखे नव्हते. पहिला टप्पा अंदमान व भारता-

(पृष्ठ ५८ वर पहा)

अनुक्रमणिका

# रामनारायण आणि सारंगी



भास्कर उत्तरवार

गेल्या जवळ जवळ चोवीस वर्षांच्या संगीत क्षेत्रांतील उमेदवारींत रामनारायणांनी दोन गोष्टी आवर्जून मिळविल्या, जपल्या, आणि वाढविल्या. एक म्हणजे आपल्या सारंगीवरचे अकृत्रिम प्रेम आणि दुसरे म्हणजे पारंपारिक कसोटयांवर घासून पुसून स्वच्छ आणि शुद्ध झालेले घराणेदार संगीत. ह्या स्वच्छ संगीताच्या प्रेमापायी सारंगीवर सोलो सादर करण्याची प्रथा लोकप्रिय करीत असतानासुद्धा वाद्यवादनात अभावितपणे शिरणाऱ्या वाद्याच्या तांत्रिक चमत्कारां-पासून आपली सारंगी त्यांनी अलिप्त ठेवली. जुन्या पद्धतीत रागाचे अस्ताई आणि अंतरे ज्या शुद्ध स्वरुपांत सुरांचे प्राधान्य राखून पेश केले जात त्याच पद्धतीनें ते आजहि त्याच स्वरुपांत आपल्या सारंगीतून पेश करतात. सुरु-वातीपासून त्यांना तालीम देणारे पंडीत माधवप्रसाद, खांसाहेब वहीदखां ह्यांच्या-सारखे घरंदाज गायक त्यांना मिळाल्यामुळे त्यांची स्वच्छ गायकीच त्यांच्या सारं-गीत उतरली आहे.

तसे बघितले तर सारंगी हे बरेच पुरातन वाद्य असूनहि त्यांत आवर्जून सांगता येतील अशी घराणी नाहींत किंवा इतर वाद्यांत आढळून येणारे बाजहि नाहीत. सारंगीच्या क्षेत्रात महान् म्हणून ठरलेले बूंदूखान ह्यांनी सुद्धा सारंगी पेश केली ती बहुतांशीं गाय-कीच्या धाटणीवर. स्वतंत्र बाज निर्माण करण्याची व ते रूढ करण्याची कोणी तसदी घेतलेली दिसत नाही. सारंगी साथीचे वाद्य म्हणून गौण स्थानात राहिली ते ह्याचमुळे. सुरुवातीपासूनच सतार किंवा सरोद ह्यासारखे स्वतंत्र अस्तित्व सारंगीला वाद्य ह्या नात्याने असते तर कदाचित् असे घडून आले नसते. ह्या अत्यंत potential वाद्यांतूनहि मोठी परंपरा निर्माण झाली असती आणि हे सारंगीचे प्रख्यात वस्ताद असा एकांडा उल्लेख होण्याऐवजी हे अमुक बाजाचे उस्ताद असा सारंगीयाचा सादर उल्लेख झाला असता

पण स्वतंत्र जरी नसले तरी वादनाच्या विविध शैली (styles) मात्र सारंगीयांनी मिळविल्या. आणि वाढ-विल्या. ह्या शैली सारंगीला लावण्यात आल्या तरी त्या बसविल्या होत्या त्या त्या भागांतल्या गायकीवर. जशी गाय-कीची शैली तशीच सारंगीवादनाचीहि शैली तयार झाली. बुंदूखानांनी माळवा राजस्थान शैलीत, पं. गोपाल मिश्रांनी बनारसी शैलीत आणि पै. गुलाम सबीर ह्यांनी पंजाबी शैलीत सारंगी सादर केली ती त्या त्या भागांतल्या गायकीला अनुलक्षूनच होती.

असे असले तरी सारंगीला स्वतःची शैली नसते असे नाही. ही गायकीच्या अगदी स्वतंत्र असूं शकते; सारंगीच्या स्वतःच्या वैशिष्टयांतून निर्माण होऊं शकते. ह्या सारंगीच्या वैशिष्टयांमुळेंच गायकीच्या धाटणीवर सारंगी सादर करूनहि अनेक विख्यात सारंगीयांनी आपल्या वादनांत स्वतःचे असे वेगळेपण आणले.

सारंगीचे हें वैशिष्टय गजाच्या हालचालीत आणि तंत्रावरून होणाऱ्या








बोटांच्या चलनांत सांठविलेले आहे. गजाची सरळ आणि उलट फिरत (उजवी आणि डावी चाल) तारांमधून एकच सूर सूक्ष्म फरकाने काढते. सरळ गजांत सुरावट मृदु येते तर उलट गजांत ती किंचित् तीव्र येते. ह्याला कारण सरळ गज हाताचा कमीत कमी भार न पडता फिरूं शकतो तर उलटा गज हाताचा सूक्ष्म भर पडल्याशिवाय फिरत नाहीं. सहज ऐकणाऱ्याला हा भेद कळत नसला तरी नीट ऐकणाऱ्याच्या लक्षांत हे आल्यावाचून राहत नाही. सारंगीच्या ह्या अंगाचा योग्य तो फायदा करून घेतल्यास सुरावटींत विविधता आणता येते.

मौखिक गायकीत स्वर नेहमीच एकाच pitch चा राहत नाही. आलाप आणि विलंपतमध्ये गायक रागाचे स्वरूप सिद्ध करतांना स्वरांच्या विविध रुपांचे दर्शन घडवित जातो त्यावेळी एकच सूर तो निरनिराळ्या घनतेने काढतो; कधी मृदु, कधी सकंप कधी मींडयुक्त तर कधी भर देऊन अधिक जाड. सूर जोर देऊन खेंचले गेले की त्यांत ह्या घनतेच्या विविध छटा गायकाच्या मगदूराप्रमाणे उमटत राहतात; आणि गाणे अधिकाधिक विविधतापूर्ण होत राहते.

तीव्र आणि कोमल सुरांचे प्राधान्य असलेले राग त्यांतील विशिष्ट रागस्वभाव दर्शन करणाऱ्या सुरांवर, मुक्काम आघात किंवा विभिन्न अंगांनी स्पर्श करून सादर केले जातात तेव्हां प्रत्येक सुराचे पोत texture सतत बदलत राहते. ह्या पोताच्या बदलण्याची किंवा विणण्याची क्रिया एवढी सलग आणि एकांतून एक अशी होत राहते की, त्या सर्वांचा एकसंधी परिणामच श्रोत्यांच्या मनावर होत राहतो.

नेमकी हीच गोष्ट सारंगीच्या गजाच्या सरळ आणि उलटचा हालचालींमधून घडून येते. गायक ज्या पद्धतीने सुरांचे पोत क्षणोक्षणी बदलत जातो त्याच पद्धतीने गजाची सरळ आणि उलट हालचाल नियंत्रित करून सारंगीया स्वरांचे पोत बदलीत राहतो. म्हणूनच एकाच एका गायकाची सतत साथ केल्यावर सारंगीया सारंगी स्वतंत्र वाजवितांना त्याच गायकाची गायकी त्याच पद्धतीने पेश करूं शकतो. गायकाचा आवाज मृदु, मुलायम आणि भरपूर लवचिकता असलेला असला, स्वरांवरची नाजुक आंदोलने आणि वळसे तो हुकुमीपणाने काढूं शकणारा असला तर त्याला साथ करणाऱ्या सारंगीयाच्या वादनांत गजाची सरळ हालचाल अधिक प्रामुख्याने आढळून येते. उलट गायक ढाल्या आवाजाचा, रेकून स्वर लावणारा आणि आक्रमक तंत्रकारीचा असला तर त्याच्या गायकीत स्वराचे उच्चार अधिक तीव्र येतात आणि सारंगीयाला साथ करताना गजाची उलटी हालचाल अधिक प्रमाणांत वापरावी लागते.

स्थूलमानाने हे दोन भाग असले तरी गायकी कोणत्याहि प्रकारची असो गायकाच्या सुरांची घनता ही सतत बदलती राहते. विशेषतः अस्ताई सिद्ध केल्या गायक हळुहळूं जेव्हा तानांची फिरत वाढवायला लागतो त्यावेळी त्याचा सूर पातळ आणि जाडीच्या झोपाळ्चावर इतक्या वेगाने आंदोलने घेत राहतो की, त्या आंदोलनांची संगत राखायला सारंगीयाला आपल्या सरळ आणि उलट गजाची हालचाल करताना सारे कसब पणाला लावावे लागते. विलंपतमध्ये सुरांच्या गुणधर्माचा अंदाज घेऊन गजाची हालचाल ठरविणे एकदाचे सोपे पण द्रुत लयींतल्या विशेषतः गमकेच्या व बोलतानांच्या वेळी पुढील सुरांचा अंदाज घेऊन गजाची दिशा ठरविणे हे अति दुष्कर काम आहे. गायकाची गाण्याची पद्धति परिचयाची असली, त्याची सूर लावण्याची, खेचण्याची किंवा भार देण्याची स्थाने माहितीची असली, त्याचे पलटे, मुरके आणि खटके परिचयाचे असले आणि आवाजाची कक्षाहि हाताळलेली असली तर सारंगीया आपल्या पूर्वानुभवातून गजाची हालचाल निश्चित करू शकतो, पण गायक अगदी नवखा असला, त्याची गायनाची पद्धत नवीन असली तर मात्र सारंगीयाला केवढे अवधान ठेवावे लागते त्याची कल्पनाच केलेली बरी.

गंमत अशी की, ह्या पद्धतीची दुष्करता बहुतेक सारंगीयांच्या आवाक्याबाहेरची असल्याने ते ह्या पद्धतीच्या फारसे वाटचालाच जात नाहीत. गायकाचा सूर सरळ आणि उलटचा गजाच्या हालचालीतून निघणाऱ्या सुराच्या पोताशी जुळता ठेवण्याच्या भानगडीत ते सहसा पडतच नाहींत.

रामनारायणच्या सारंगीवादनांत मात्र हें अवधान काळजीपूर्वक सांभाळलेले आढळते. त्यांनी सारंगीचा रियाझच मुळी ह्या पद्धतीवर केलेला असल्याने त्यांच्या वादनाची घडणच तशी झालेली आहे. सुरुवातीपासूनच उत्कृष्ट गायकांची तालीम आणि सारंगीच्या ह्या वैशिष्टचाची योजनापूर्वक ठेवलेली जाणीव ह्यांतून त्यांनी आपली पद्धति तयार केली, ती त्यांच्या नांवेंच उल्लेखित करायला हवी. जवळ जवळ सर्वच प्रथम श्रेणीच्या गायकांना आतापर्यंत त्यांनी साथ केलेली असल्याने ह्या पद्धतींत त्यांनी चांगलीच निपुणता घेतली आहे. कितीहि वेगवान गायकी असो, पुढील सुरांचा अंदाज घेण्याचे त्यांचे कसब नैसर्गिक आहे. ह्याच गुणामुळे गायकाची तान ते सही सही उचलून सारंगीतून काढतात. त्यांनी अनेक गायकांच्या प्रत्यक्ष गात असतांना (पं. ओंकारनाथ ठाकूरांचे नांव ते अगत्याने सांगतात) 'शाबास' अशा तात्कालिक पावत्या घेतल्या, ते ह्या नैसर्गिक कसबामुळेच.

सारंगीच्या ह्या एका अंगामध्येच केवढे तरी गर्भित सामर्थ्य ( potentiality ) सांठविले आहे. केवळ ह्या एका अंगाच्या

पद्धतशीर प्रयोगामधून सुद्धा सारंगीचा सोलो अतिशय परिणामकारक रीतीने सादर केला जाऊं शकतो. सुरांना त्याच्या पोतांची नैसर्गिक पातळ आणि जाड अशी उपज देऊन सारंगीतून मोहरेदार ताना काढता येतात. गजाच्या हालचालीच्या पद्धतशीर नियंत्रणामधून निरनिराळे पोत असलेल्या स्वरसमूहाचे एवढे वैशिष्टच-पूर्ण सुंदर विणकाम होऊं शकते की, त्यांतूनच एक स्वतंत्र बाज निर्माण व्हावा. आरोह आणि अवरोह ह्यातील स्वरसमूहाचे तालानुवर्ति तुकडे पाडून प्रत्येक तुकड्याला वेगवेगळे texture दिले की, अनेक सुंदर असे स्वरबंध तयार होतात. असे एकामागून एक स्वरबंध वादनांत यायला लागले की, सारे वादनच अतिशय विविधतापूर्ण आणि रंजक होत जाते. आणि सूरांशी इमान राखून रागाचे स्वच्छ स्वरूप ह्या विणकामांतून (patterns) हळूहळूं साकार होत जाते. हे स्वरबंध कसे तयार होतात, हे खालील उदाहरणा-वरून कळेल.

——— सरळ गज.
——— उलटा गज.

८ मात्रा. आरोह— ग म प नि सा रे ग रे

अवरोह—सा नि ध प म ग रे सा

स्वरबंध १ ला. ग म प नि सा रे ग रे

सा नि ध प म ग रे सा

स्वरबंध २ रा. ग म प नि सा रे ग रे

सा नि ध प म ग रे सा

स्वरबंध ३ रा. ग म प नि सा रे ग रे

सा नि ध प म ग रे सा

स्वरबंध ४ था ग म प नि सा रे ग रे

सा नि ध प म ग रे सा

अशा प्रकारे कितीतर स्वरबंध पुढे पुढे काढीत नेता येतात. ह्यातच पुढे पुढे आंदोलनयुक्त ताना काढतांना हे स्वरबंध २ सुरांचा एक किंवा १ सुराचा एक ह्या पद्धतीने निघूं लागतात त्यावेळी वादनाला चांगलीच गति आलेली असते.

हे सारे स्वरबंध बांधताना मात्र रागाचे स्वरुप, आरोहावरोहांत वादी संवादीची स्थानें, स्वरांचें गुणधर्म इत्यादींवर अतिशय अवधान ठेवावे लागतें. स्वराचें रागांतील स्थान योग्य सांभाळले नाही तर वरील पद्धतीचे स्वरबंध केवळ तांत्रिक पद्धतीचे ठरून कंटाळवाणे होण्याचा संभव असतो. ह्याचसाठी सारंगीयाचे शिक्षण शास्त्रशुद्ध पद्धतीवर आधारलेले असले तर वरील प्रकारचे स्वरबंधहि तितकेच सूक्ष्म, शुद्ध आणि मूळ रागाच्या खुलावटीला अधिकाधिक पोषक होत जातात.

रामनारायणांचे सारे सुरुवातीचे शिक्षण उस्ताद मेहबूबखां (उदयपूर), पं. माधवप्रसाद, उस्ताद वहिदखां (किराना) ह्या गायकांच्याजवळ झाल्याने त्याचे राग शुद्ध स्वरूपांत खुलविण्याचे अंग चांगले तयार झालेले आहे. आपली सारंगी ह्याच अंगाने वाजवित वरील प्रकारच्या स्वरबंधानी तानांना उपज देऊन जेव्हा ते रागाची खुलावट करीत जातात, तेव्हां ऐकतांना केवळ सारंगीचा सूरच कानांत विरघळत राहत नाही तर त्या रागाचे स्वरूपहि रससिद्ध होऊन मन:चक्षूंपुढे स्पष्ट होत जाते.

सारंगीचे हे विशिष्ट अंग जसजसे रामनारायणांच्या सारंगीत रियाजाने उतरूं लागले तसतसा त्यांना सारंगीच्या स्वतंत्र वादनप्रकाराबद्दल विश्वास बळावत चालला. पुढे पुढे तर गवयांना साथ करतांना त्यांना त्यांचे गायन अनेक बाबतीत अपुरे पडते असें आढळून येऊं लागले. गायकाने घेतलेली एखादी तान त्याने तशी न घेता सुरांवरचे आघात बदलून वेगळ्या पद्धतीने घेतली असती तर अधिक श्रवणीय झाली असती असे वाटून ते अस्वस्थ व्हायला लागले. विशेषत: लाहोर आणि दिल्ली रेडीओवर गायकांना साथ करताना त्यांना ही जाणीव अतिशय तीव्रतेने व्हायला लागली. साथ करताना गाणारे गायक विलंपतमध्ये सुरांचे अवधान सांभाळून गात खरे पण द्रुत गतीत आल्यावर सुरांची बरीच गल्लत ते करीत तेव्हां त्यांना साथ करणे कठीण होई. केवळ पेशा म्हणून साथ करताना गायकांच्या चुकासुद्धा सारंगीचे गायनाशी वैधर्म्य येऊं नये म्हणून सारंगीतून उगाळाव्या लागतात ह्या कटु अनुभवामुळे ते अधिकाधिक अस्वस्थ झाले आणि साथ करणे सोडून सारंगीचे स्वतंत्र वादन करण्याचे त्यांनी निश्चित केले. आज जवळ जवळ सगळ्याच प्रथम श्रेणीच्या गायकांना साथ करूनहि ते ह्याच निष्कर्षाला येऊन पोचले आहेत. साथ करण्यासाठी येणारी निमंत्रणे गायक केवढाहि प्रसिद्ध असला तरी ते नम्रतेने नाकारतात. ह्याला अपवाद मात्र पं. ओंकारनाथ ठाकूर ह्यांचा आहे. अजूनहि पंडितजींच्या गायनाला त्यांच्याविषयी असलेल्या नितांत आदराने ते अगत्याने साथ करतात. ज्यांनी पंडितजींचे गायन रामनारायण साथीला असतांना ऐकले असेल त्यांनी रामनारायण केवढे रंगून पंडितजींना साथ करतात हे अनुभविले असेल.

वाद्याच्या सोलो वादनाची रूढ पद्धति विलंपत, जोड, ताना, झाला आणि गत अशी आहे. बिलंपत, जोड, ताना वगैरें-बाबत प्रश्न नव्हता पण झाला वाजविणे झाल्यास तो इतर तंतुवाद्यांप्रमाणे न घेता सारंगीचे वैशिष्टच कायम ठेवून निघायला हवा होता. बुंदूखान रूढ पद्धतीने वाजवित. पण त्या रूढ पद्धतीने वाजविल्यास सारंगीचे वैशिष्टच उरत नाही हें रामनारायणांच्या लक्षात आले. व्हायोलिनवर झाला घेतांना वादक गज तारांवर अतिवेगाने फिरवितो, चक्क खसखसून घासतो हें बघून त्या पद्धतीने वाजविण्याचे त्यांनी अजिबात टाळले. गजाची हालचाल संथ व लयबद्ध ठेऊन केवळ बोटांच्या चलनांचा वेग वाढविल्यास झाल्याच्या परिणाम येतो आणि त्यांत सारंगीचे वैशिष्टच कायम उरते ह्या दृष्टींतून रामनारायणांनी गजाचीं चलनें कमींत कमी ठेऊन बोटांची चलने वाढवून आपली झाल्याची पद्धति बसविली. ही पद्धति जरा तांत्रिक असल्याने उदाहरणांनींच स्पष्ट होईल.

| | | |
|---|---|---|
| (१) गजाचें एक सरळ चलन – | वोटाचें एक चलन | १ सूर |
| (२) गजाचें एक उलटें चलन – | " | १ सूर |
| (३) गजाचें एक सरळ व एक उलटें चलन | " | १ सूर |
| (४) गजाचें एक सरळ चलन – | वोटाचीं एकापेक्षां अधिक चलनें. | १ पेक्षां अधिक सूर. |
| (५) गजाचें एक उलटें चलन – | " | " |
| (६) वरील दोन्ही चलनांचा संयोग. | " | " |
| (अ) गजाचें एक चलन सरळ किंवा / उलटें आणि | बोटांचीं ४ चलनें | ४ सूर |
| (ब) " | बोटांचीं ३ चलनें | ३ सूर |
| (क) गजाचीं २ चलनें सरळ किंवा / आणि उलटी | बोटाची ४ चलनें | ४ सूर |
| (ड) गजाचीं ३ चलनें सरळ किंवा / आणि उलटीं | बोटांची ४ चलनें | ४ सूर |

अशा पद्धतीचीं अनेक संयोगें (Combinations) एका तालांत, त्याच तालाच्या दुहाई किंवा तिहाईत तसेंच एवढे सबंध बांधकाम त्याच तालाच्या सवाई किंवा दीढींत !

हा सगळा व्याप बघितला म्हणजे त्यांच्या ह्या प्रकारच्या झाल्यांत केवढे तंत्रकाम सांठविलेले आहे ह्याची कल्पना येईल. ह्या पद्धतींतून एकदा काढलेला स्वरबंध पुन्हा न काढता सुद्धा तासन् तास झाला वाजूं शकतो. एवढेंच नव्हे तर आजच्या प्रेक्षकांना आवडणाऱ्या आणि हटकून टाळ्या घेणाऱ्या तबल्याशी होणाऱ्या खटकेबाज करामतीहि त्यांतून यशस्वीपणे साधल्या जाऊं शकतात. सोलो वादनाचे कार्यक्रम लोकप्रिय करायला ह्या खटक्यांच्या करामती आज आवश्यक होऊन बसल्या आहेत. मोठमोठ्या वादकांनाहि लोकप्रियतेच्या आहारीं जाऊन त्यांचा मोह आवरणें शक्य झालेले नाही.

पण गंमत अशी की हे लोकप्रियतेचे आमीष पुढे असूनसुद्धा त्यामुळे खऱ्या संगीताची मरगळ होते हे बघून त्यांनी हा झाला कधी पेश केला नाही. सारंगीवरच्या आणि अभिजात संगीतावरच्या प्रेमापायी त्यांनी लोकप्रियता बाजूला सारली. लोकप्रियतेच्या नादी लागून खऱ्या संगीताचा आत्मा त्यांच्याकडून गुदमरला जावा हे त्यांना नको आहे. झाल्यामध्ये आणि गतवादनामध्ये घडून येणारे तंत्राचे चमत्कार (रामानारायण त्यांना 'करीष्मे' म्हणतात.) त्यांना नको आहेत. गजाच्या हालचालीपेक्षा बोटांच्या हालचालींमधून सुरांची अनंग दुनिया निर्माण करणेच त्यांना अधिक आवडते. रागाच्या मूळ स्वरूपाला ते अत्यंत महत्व देतात. त्या रागांत अभिप्रेत असलेला रस जर गायकाला किंवा वादकाला निर्माण

करतां आला नाही तर त्या रागावर अन्याय केल्यासारखे होते, सूराचे पावित्र्य ढळते आणि मैफीलीत सुराची धुंदी न राहता केवळ वादनाचे करीष्मेच उरतात; मैफिल खऱ्या अर्थाने मैफिल न राहता सर्कशीचे रिंगण होऊन जाते, असे त्यांना वाटते.

ह्याच कारणाने त्यांनी त्यांचा तंत्र-प्रधान असलेला झाला, त्यांच्या नांवावर खपविला जाण्याची शक्यता असूनसुद्धा कधींच पुढें येऊ दिला नाहीं.

संगीताच्या ह्या अंगाबाबत त्यांचे विचार अगदी स्पष्ट आहेत. त्यांच्या मतें भारतीय संगीताची मूळ घडणच संथ लयींतली (legato) आहे. तालवाद्याचा उपयोग गायन वा वादनामध्ये काल-निश्चितीसाठी केलेला. खरें गायन रागाच्या बिलंपतमधल्या स्वरविस्तारांत असतें. अंतऱ्याच्या द्रुतगतीतहि खरें अभिप्रेत असतें तें सुरांचेंच चपळ आणि लवचिक अंग. ह्या पद्धतीनें रागाची विभिन्न अंगें उभीं केल्यावर त्यांतून जी रससिद्धी होते ती तंत्रकारीचे कितीहि चमत्कार केले तरी त्यांतूनच निर्माण होणें शक्य नाही. गायन किंवा वादन हें मूलतः अंतःकरणासाठी असतें, बुद्धीसाठी नव्हे, म्हणूनच राग जेवढा शुद्ध स्वरूपांत स्वरांचें आंतरिक सौंदर्य उलगडीत मांडला तेवढा तो अंतःकरणाला अधिक भिडतो, असें त्यांना वाटतें.

रामनारायणांनी सूराशी असें इमान राखल्यामुळेंच त्यांचें सारंगीवादन मोठें हृदयंगम असते. त्यांतील घराणेदार अस्ताई आणि अंतऱ्याचें स्पष्टपणें होणारें दर्शन अतिशय मनोहर असतें. बिलंपतमध्ये त्यांच्या सारंगींतून निघणारे मोहरेदार सूर रागाचें स्वरूप हळुहळूं उलगडून मांडूं लागतात तेव्हां एक अत्यंत मिठ्ठास आवाज असलेल्या गायकाच्या सूरप्रधान गायकीची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. नेमक्या ठिकाणीं घेतलेलें रागाचें चलन स्पष्ट करणारे स्वरसमूहाचें बंध, योग्य ठिकाणीं घेतलेल्या पलटचा, सुरांचीं वेह-लावे आणि आंदोलनें ह्यांची अभिजात गुंफण मध्यलयींतल्या ठेक्यावर करीत करीत ते जेव्हां स्वरांच्या दाणेदार लडी एकामागून एक उघळीत जातात तेव्हां नुसतें ऐकत रहावेसें वाटतें. कुठे गडगडाट नाही, समेवर येतांना झटका बसेल असा खटका नाही, गजाची घासाघीस नाही की, तंत्र-कारीचे चमत्कार नाहीत. अंतऱ्यांतील एका सुरावरून सुरूं होऊन निरनिराळ्या सप्तकांत घुमून मूळच्याच सूरावर नेमकी अलगद उतरणारी त्यांची तान खरोखर ऐकण्यालायक असते.

जुन्या बांधलेल्या चिजांच्या बंदिशी त्यांना आवडतात. केवळ एकादा स्वर-समूहाचा तुकडा बरा वाटतो म्हणून तो जुन्या बंदिशींत घुसडून देणें त्यांना आवडत नाही किंवा अशा तुकड्यावर आधारून नविन आरोहावरोह तयार करणें आणि त्याला नांव देऊन नविन राग म्हणून तो खपविणें हेंहि त्यांना आवडत नाही. नव्याच्या हव्यासापायीं जुन्या रागांची वाटेल तशीं मिश्रणें करणें त्यांना नापसंत आहे. त्यांच्या मतें जुन्या बंदिशीच इतक्या चांगल्या आहेत की, त्यांचाच नुसता विलास करून मांडतो म्हटलें तरी त्या कोणत्याहि नवीन मिश्रणांपेक्षा अधिक प्रभावशाली परिणाम घडवून आणतात.

ते बहुधा सारंगीवर जुने राग अधिक वाजवितात. सकाळच्या रागांपैकी ललित, तोडी, आसावरी, गुणकली, दुपारच्या पैकी बिलावल, गौड व शुद्ध सारंग आणि सारंगाचे सर्व प्रकार, संध्याकाळच्या पैकी पटदीप, मारवा, पूरीया आणि रात्रीच्या रागांपैकी दरबारी, मालकंस, कौशीकानडा हे राग त्यांना अधिक आवडतात.

रागांच्या शुद्ध आणि घराणेदार संगी-ताच्या प्रेमापायीं त्यांनी आपल्या सारंगी-वादनांत मूळ चीजेचा मुखडा आणि रागाची पकड दाखविणारे आलाप मधूनच एकदा म्हणायचें सुरूं केलें आहे. एकदा असा मुखडा आणि पकड म्हणून दाखविल्यावर त्याच फिरतींत ते सारंगींतून ती चीज वाजवित जातात. गंमत अशी की, चिजेचा मुखडा तोंडानें म्हटल्यानंतर त्यांचें सारंगी-वादन घराणेदार गायकीच्या थाटाचें कसें हें चटकन लक्षांत येतें. ज्यांनीं त्यांचे गेल्या २० मार्चचे मुंबई व वरून ध्वनीक्षेपित झालेले सारंगीवादनाचे कार्यक्रम ऐकले असतील त्यांना मी वर लिहिले त्याची कल्पना येईल.

रामनारायणानी हिंदुस्थानांत जवळ जवळ सर्वच प्रांतात त्यांनी कार्यक्रम पेश केले आहेत. १९६४ सालीं आपले थोरले बंधू कै. पंडीत चतुरलाल (प्रसिद्ध तबलिये) ह्यांच्यासह युरोपांत पॅरिस, व्हिएन्ना, लंडन वगैरे ठिकाणीं कार्यक्रम केले आहेत. भारतीय श्रोत्यांचे त्यांना फारसे चांगलें अनुभव नाहींत. अभिजात संगीताऐवजी संगीतात आजकाल घुसलेल्या जुगलबंदी, तबला आणि वाद्याची रसाहानी करणारी लढत वगैरे संगीताला मारक असलेल्या गोष्टींची वाढती लोकप्रियता बघून त्यांना वाईट वाटते. "ये संगीत के लिये वहोत बुरा है जी महाराज" म्हणून ते वारंवार खेद व्यक्त करताना आढळतात. तसेंच गायकाशी साथ करतांना गायकानें साथीच्या सारंगीयाकडे संशयाने बघणे, शक्य तो त्याला अटकवण्याचा प्रयत्न करणे आणि उगाच वरचढपणा दाखविण्याचा प्रयत्न करणेंहि त्यांना आवडत नाही. फारच थोड्या गायकांचा खरे निष्ठावंत आणि खेळाडू वृत्तीचे म्हणून ते उल्लेख करतात. त्यांत पंडीत ओंकारनाथ ठाकूर, कुमार गंधर्व आणि भीमसेन जोशी ह्यांचा अगत्याने उल्लेख होतो. त्यांना भारतीय श्रोत्यांची crowd mentality आवडत नाही. भारतीय श्रोत्यांमध्ये त्यांना महा-राष्ट्रांतले श्रोते अधिक आवडतात. वाटेल त्या ठिकाणीं वाहवाची निरर्थक फैर झोडण्यापेक्षां महाराष्ट्राचा शांत आणि योग्य त्या ठिकाणीं हटकून दाद देणारा श्रोता त्यांना आवडतो.

पाश्चात्य श्रोत्यांपुढे वाजवितांना अधिक मोकळे वाटल्याचे ते सांगतात. त्यांचा कार्यक्रम अगदी शांतपणे ऐकण्याची पद्धति आणि ज्यांना संगीतात रुचि आहे त्यांनीच गाण्याच्या कार्यक्रमाला उपस्थित राहण्याची पद्धति त्यांना आवडते. अर्थात असे श्रोते भारतांत निर्माण व्हावे अशी तळमळ त्यांना लागलेली असल्यास त्याबाबत दुमत व्हायला नको. • • •





# डो ळे

—सदा कऱ्हाडे

**त्याला ते दोन डोळे दिसतात. एका नक्षत्राभोवती लाख चांदण्यांची गर्दी दिसावी तशी त्या दोन डोळ्यांभोंवती असंख्य डोळ्यांची गर्दीच गर्दी दिसू लागते........आणि मग तो झोपतच नाही.........**

'**माधवला** अलीकडे झोपच येत नाही. झोप यावी म्हणून तो अनेक प्रयत्न करतो. डोळचांना पेंग येईपर्यंत वाचन करतो. डोळचांच्या पापण्या जड होतात. झोप येते असं वाटतं. तो पुस्तक बाजूला करतो. दिवा मालवतो. जडावलेल्या पापण्या एकत्र आणतो. पण विजेचा झटका बसावा तशा पापण्या अलग होतात. डोळचांना अंधार दिसूं लागतो. विस्तवानं आग व्हावी तशी त्यांच्या डोळचांची आग होऊ लागते. तशा अंधारांतच तो चाचपडतो. कोलन वॉटरची बाटली उघडतो. डोळचांना लावतो. कपाळाला लावतो. किंचित् बरं वाटतं. किती शांत वाटतं... किंचित् आग शांत झाल्यासारखी वाटते...पण पुनः तेच. पुनः तीच आग. तीच अस्वस्थता. उघडया पापण्यांच्या आवरणाखालीं जाग्या असलेल्या डोळचांतल्या बाहुल्या तरी क्षणभर मिटाव्या म्हणून तो धडपडतो...पण झोप नाही. पुनः दिवा लावतो. प्रकाशानं डोळे दुखतात. दुखल्यावर तरी मिटतील... आपले डोळे दिव्यांच्या अगदी जवळ नेतो. उष्णतेनं डोळे करपून जातात असं वाटतं... दिवा मालवतो...पुनः अंधार...

सकाळपर्यंत डोळे उघडेच असतात. पापण्या जडावलेल्या असतात. सकाळीं तो उठतो. थंड पाण्याचा मारा डोळचावर करतो. थंड पाण्यानंच तोंड धुतो. मुकाटचानं आंत जाऊन बसतो. त्याची बायको त्याच्या पुढचांत चहाचा कप ठेवते. कप ठेवतां ठेवतां तिचं लक्ष त्याच्या डोळचांकडे जातं...

'काल रात्रीं पण झोप नाही का लागली?'

'नाही...'

माधव अस्वस्थ होतो...चहा पिऊन झटकन् निघून जातो.

हे रोजचंच झालं आतां. तोच प्रश्न. तीच अस्वस्थता. माधव मग मालतीशीं फारसं बोलतच नाही...मालती कदाचित् खोदून खोदून विचारायची. नको त्या शंका...कुशंका...

आणि तिला सांगायचं तरी काय? रात्रीं भीति वाटते म्हणून...की, दचकायला होतं म्हणून...पांच वर्षाच्या मिनीला सुद्धां काळोखाची भीति वाटत नाही. बागुलबुवा आला तर त्याला लाकडी घोडा बसायला देईन असं ती धिटाईनं म्हणते... आणि आपल्याला रात्रीची भीति वाटते...!

मालती विचारणार रोज. झोप कां येत नाही? काय सांगणार तिला...

...मी झोपलों तर मला दोन डोळे दिसू लागतात. माझ्यावर रोखलेले काळेभोर डोळे...हसणारे...पण केविलवाणे ...अभिमान बाळगणारे पण याचना करणारे..नक्षत्राप्रमाणे चकाक-

णारे पण विझलेल्या ज्योतिप्रमाणें निस्तेज...असे दोन डोळे दिसतात. मग त्यांची भीति वाटते...वाटतं हे डोळे खूप मोठे होतील..अजगराच्या वासलेल्या जवडयाप्रमाणे दिसूं लागतील ...आणि मला एकदम गट्ट करून टाकतील...

माधवला असे ते दोन डोळे दिसतात...विलक्षण, एका नक्षत्राभोंवती लाख चांदण्यांची गर्दी दिसावी तशी त्या दोन डोळयाभोंवती असंख्य डोळयांची गर्दीच गर्दी दिसूं लागते...हस-णारे डोळे...केविलवाणे डोळे...प्रकाशणारे डोळे...निस्तेज डोळे...अभिमान बाळगणारे डोळे...याचना करणारे...डोळेच डोळे त्याला दिसूं लागतात...झोपेंतल्या काळोखांत...भीति वाटते. मग तो झोपतच नाही...रात्र रात्र...जागत रहातो...डोळे लाल होतात.. पेटती आग प्याल्यासारखे...

त्या दोन डोळयांनी माधवला पुरेपुरे घेरले आहे. भुताटकी-सारखे, पिशाच्चासारखे ते डोळे त्याला त्रस्त करीत आहेत. त्या दोन डोळयांची त्यानं धास्ती घेतली आहे...

हे डोळे त्याला पूर्वी कधीं दिसले नव्हते. त्या डोळयांनी त्याच्या स्वप्नसृष्टींत असें विलक्षण नर्तन यापूर्वी कधीं केलें नव्हते. ह्या डोळयांचें अस्तित्व त्याला जाणवले नव्हते...फार वर्षापूर्वी त्याने हे डोळे पाहिले होते. त्यांतला काळेभोरपणा पाहिला होता. त्यांतलें तेज पाहिलें होतें. त्या डोळयांतली गाढता पाहिली होती. काजळपाणी पाहिलें होतें. त्या काजळ पाण्यांत स्वत:चे प्रतिबिंबहि पाहिलें होतें...

ते डोळे त्याने ह्यापूर्वी पाहिले होते. ते डोळे विझून गेले. त्या डोळयांना तो विसरून गेला.

मालतीशीं लग्न झाल्यावर तो हे डोळे विसरून गेला. मिनीचा जन्म झाल्यावर त्या दोन डोळयांचें अस्तित्वच त्याच्या दृष्टीने संपुष्टांत आलें होतें. असे दोन डोळे आपल्या परिचयाचे आहेत हेहि तो विसरून गेला....

परंतु परवां अचानक त्याला झोपेंत दोन डोळे दिसले... आणि तो दचकून उठला...

त्या दिवशीं संध्याकाळीं तो घरीं आला तेन्हां मालती त्याची वाट पहात होती. मिनीचा जन्म झाल्यापासून मालतीनं त्याची अशी वाट पाहिली नव्हती. मालती आई झाली. तिच्यासाठीं वेगळें जग निर्माण झालें. त्यांत ती दंगली...माधव संध्याकाळी घरीं येईपर्यंत ती मिनीचं कांहीतरी करीत असायची...कॉफी करून द्यायला सुद्धां तिला वेळ लागायचा...माधवला संवय झाली होती...

पण त्या दिवशीं मालती त्याची वाट पहात असलेली पाहून माधव थक्कच झाला. मालतीने वेगळाच साजशृंगार केला होता. निळया अस्मानी रंगाची साडी...पांढरा रेशमी ब्लाऊज...किती-तरी वर्षांनी तिनं दोन सैलशा वेण्या पाठीवर सोडल्या होत्या. त्या वेण्यांत मोगरीचीं फुलं माळली होती.

दारांत पाऊल ठेवताक्षणींच मोगरीच्या सुगंधानं माधव गुदमरून गेला. वेडावून गेला. लाख लाख कळयांनी मालती अंगअंग फुलून गेली होती.

'आज मिनी घरीं नाही?' मालती लाडिकपणे म्हणाली.

'कुठं गेली?'

'मावशीनं नेलं तिला घरीं...उद्यां येईल...'

'पण एवढा साजशृंगार...'

'शूऽऽत...' ओठांच्या फुलकळीवर निमुळतं बोट ठेवत मालतीनं दटावलं.

'हें काय?'

'इश्शऽऽ...!...नाही आठवत...'

'छे!'

'आज खूप मजा करायची' मालतीनं स्वत:भोंवती गिरकी घेतली. पांच वर्षाच्या मुलीची आपण आई आहोत हेंहि ती विसरून गेली...'अहोऽ आज वाढदिवस लग्नाचा...'

मग माधवहि फुलून गेला.

जीवनांतल्या आनंदाच्या अत्युत्कट क्षणांचा अनुभव घेऊन एका वेगळयाच स्वप्नधुंदीत माधव तन्मय झाला...आणि मग गाढ झोपी गेला. तृप्त झालेलं लहान मूल गाढ झोपी जावं तसा...

त्या रात्रीं त्याला विलक्षण स्वप्न पडलं. स्वप्नांत त्याला दोन

'वासूनाका' नव्हे, परदेशी विनोद (!)



BRAZIL - Borjallo (Manchete)






उन्नत उरोज दिसले. त्यांचा उभार त्याच्या डोळ्यांना खुपू लागला. त्यांची गोलाई त्याच्या डोळ्यांना व्यापू लागली. वेलीच्या कुशींतून गळून पडलेल्या कळ्यांना स्पर्श करावा, हलक्या हातानं... तसा माधवनं त्यांना स्पर्श केला. त्या स्पर्शानं उन्नत उरोजांचीं क्षणार्धांत नीळकमळें झालीं. पण त्याच्या श्वासलहरींनी तीं कमळें अंतर्धान पावली. आणि आपल्यावर रोखलेले दोन काळेभोर डोळे माधवला दिसले. नक्षत्रांसारखे तेजस्वी अन् विझलेल्या ज्योति-सारखे निस्तेज. माधव एकदम दचकला. खडबडून जागा झाला.

त्या दिवसापासून माधवची झोप उडाली. रात्र रात्र तो जागतो... झोप यावी म्हणून अनेक उपाय करतो... झोपेच्या गोळ्यासुद्धां त्यानं घेतल्या...

माधव सारखा विचार करतो. हे असं किती दिवस चालणार? त्याचं सगळं स्वास्थ्य नाहींसं झालं तर तो सुखी होणार नाही... मालती–मिनी सुखी होणार नाहीत...

मालती सरळ मनाची आहे. भोळ्या वृत्तीची आहे. तिला समज आहे. कांही सांगितलं तरी ती समजून घेते... मग मालतीला सांगावं काय?

पण मालतीला काय सांगायचं? ... कसं...

माधवला सुहासिनीच डोळे दिसतात झोपेंत. ते डोळे त्याला त्रस्त करतात. भुतासारखे पछाडतात.

हे मालतीला सांगायचं... ती संतापानं, त्वेषानं खवळेल... स्त्रीत्वाचा अभिमान दुखवल्यामुळं मालती आवेगानं विचारील... 'ही सुहासिनी कोण? तर मग तुम्ही माझ्याशीं लग्न कां केलंत? कां फसवलं मला? ...' मालती रडून रडून आकांत करील.

माधव असा अस्वस्थ झालेला आहे. इतक्या वर्षांनंतर सुहासि-नीचे डोळे त्याला कां दिसावे? नुसतेच डोळे... काय हवं आहे त्या डोळ्यांना. कशाची आंस... कशाची तहान... काय बघायचं आहे. एकटक त्यांना? कां माधवच्या सुखी–संसाराला नजर लावायची आहे?

अस्वस्थ झालेला माधव सारखा सारखा मनाला तोच प्रश्न विचारतो. सुहासिनीला आतां हवें आहे तरी काय? तिचें अस्तित्व तर यापूर्वीच संपुष्टांत आलें आहे. जें हवं होतं तें तिला मिळालं. तें घेऊन ती तृप्त झाली. संतुष्ट झाली. तरीहि इतक्या वर्षांनंतर आपलें अस्तित्व ती दाखवते... तेसुद्धां नुसत्या डोळ्यांचें अस्तित्व... म्हणजे सुहासिनीचें अस्तित्व संपुष्टांत आलें तरी तिचे डोळे तेवढे अजून जागे आहेत. जागल्या डोळ्यांनी माधव-वर जणूं त्यांनी पहारा ठेवला आहे...

माधव कळवळून सुहासिनीला विचारत होता... हवंय काय तुला? मी तुला कांही देऊं शकणार नाही.. तूंहि कांही घेऊं शकणार नाहीस.. देण्या घेण्यासारखं आपलं नातंच उरलं नाही. तसं नातंच कांही नव्हतं तुझं माझं... तरीसुद्धां... तूं तृप्त होऊन गेलीस...

सुहासिनीचं माधववर प्रेम होतं. पण तिनं कधीं बोलून दाखवलं नाही. तिचं प्रेम अखेर तिच्याजवळच रहाणार होतं.



तिच्या प्रेमाला रंग होता. गंध होता. त्या रंगागंधानं ती धुंद होऊन जात होती. फुलून जात होती. पण ते रंग कधीं तिनं माधवला दाखवले नाहीत. प्रेमाला तिनं कधीं शब्दांचा आकारच दिला नाही. लहानपणापासून ती माधवबरोबर वाढ-लेली, खेळलेली... त्याच्याबरोबर झोपाळ्यावर बसून उंच उंच झोके घेतले होते... त्या झोक्याबरोबरच नकळत तिच्या मनाचीं आंदोलनं सुरूं झालीं होती... पण त्या आंदोलनांवर माधवला कधीं तिनं झुलू दिलं नाही...

लहानपणीं... माधव बरोबर ती लपंडाव खेळली. गवताच्या गंजींत कुठंतरी ती लपून बसायची... पण माधवला कधीं कळायचं नाही. तिला शोधण्याचा प्रयत्न माधवनं कधी केलाच नाही..

हरलों म्हणून तो कबूल करायचा 'अरेऽ मी इथंच गवताच्या गंजींत लपले होते. . .' 'मला वाटलं तूं येशील. . . शोधशील. . .'

प्रेमाचा लपंडावहि ती असाच खेळली. . आणि एक दिवस तिनं माधवला सांगितलं. . .अरेऽ मी इथंच होतें. अगदी तुझ्या-जवळ. . .पण तुला दिसलेच नाही रेऽऽ मी. तूं कधीं शोधलंसच नाहीस मला. मी तुझी वाट पहात राहिले. वाटच पहात राहिले.

सुहासिनी माधवची वाट पहात राहिली. आणि शेवटच्या क्षणीं तेवढंच सांगायला आली. . . जें तिचं होतं तें तिच्याजवळ ठेवलं असतं तर. . .पण अखेरच्या क्षणीं तिनं माधवजवळ सांगि-तलं. . .आणि तिचं तीच गमावून बसली. . .हरवून बसली. . .

प्रेमाचा म्हणून एक काळ असतो प्रत्येकाच्या जीवनांत. प्रेम व्यक्त करण्याची म्हणून एक वेळ असते. काळवेळ जमावी लागते. . .

सुहासिनीच्या प्रेमाची काळवेळ जमली नाही. जमली असती तर. . .तर माधवच्या आयुष्यांत मालती आलीच नसती. . .

एका अवचित क्षणीं मालती माधवच्या आयुष्यांत आली. . . आली ती कायमची. . .स्वप्नपरी बनून. . .सुहासिनीला हें माहीत होतं. कळलं होतं. पण त्याची खंत तिनं बाळगली नाही. . . एक उसासा सोडला हवेंत. . . तो कायमचा विरला. . .

माधवचं लग्न निश्चित झालं. . .त्याक्षणीं दोन दिवस सुहा-सिनी माधवकडे आली. . .एक वेगळाच साजशृंगार घेऊन. . .वृत्तींत नवा मोहोर. . . अंगागावर नवा सुगंध. . . जणूं ती अत्तरांतच न्हाऊन आली होती. माधवला धुंद करण्यासाठीं, तिच्या साज-शृंगाराला अर्थ होता. . .तिनं जें शब्दांनी सांगितलं नव्हतं तें साजशृंगारांनी सुचवलं. . .जें कधीं आकाराला आलं नव्हतं त्याला साजशृंगारानं आकार दिला. . .जे निःशब्द होतं तें वृत्तींतून, अंगांगातून, डोळ्यांतून. . .केसांच्या लहरी लहरीमधून व्यक्त होत होतं; असा साजशृंगार तिनं पूर्वी केला नव्हता. . .

क्षणभर माधवला विसर पडला. क्षणापुरता तो त्याचा राहिलाच नाही. त्या साजशृंगारानं जणूं एका मोहिनीमंत्राचा उच्चार केला. . .'आणि माधव भारावून गेला. . . .

'हें अगदी शेवटचं आहे रेऽ माधव. अगदी पहिलं आणि शेवटचं. पुनः नाही करणार असा साजशृंगार. पण माधव. . .ही अखेरचीच विनंती. हा शृंगार व्यर्थ जाऊं देऊं नकोस. हा बहर. . . हा मोहर. . .हा अंगांगावर फुललेला सुगंध. . हें सारं तुझ्यासाठींच आहे रेऽ. . ."

"माझ्यासाठीं ? माझा काय अधिकार यावर?"

'तुझ्यासाठीच हा साजशृंगार करण्याचं' स्वप्न जुळवलं होतं. एकदां. . .एकदाच स्वीकार कर याचा. . .उद्यां तुझं लग्न होईल. तुझ्यावर प्रेम करणारी मालती तुझ्यासाठीं उद्यां नववधूचा साज-शृंगार करून येईल. तेव्हां तुला माझी आठवणसुद्धां होणार नाही. पण. . .आज या क्षणापुरता माझा स्वीकार कर माधव. . .लहान-पणापासून जतन करून ठेवलेलं सारं सारं तुझ्या स्वाधीन करू दे मला. तुझ्यावरचं माझं प्रेम असं सारखं वाढत गेलं रेऽ. . . त्याची वाढ आतां मनांत मावत नाही. कुठं तरी त्याचा शेवट केला पाहिजे. . .बघ. . .बघ माझ्या डोळ्यांत माधव. काजळ-पाण्यांत तुला तुझं प्रतिबिंब दिसेल. लहानपणीं चिंचा दिल्यास. तेव्हांचं तुझं प्रतिबिंब; तुझ्या बहिणीच्या लग्नांत तूं माझी थट्टा केली होतीस नाऽ. . .तेव्हांचं तुझं प्रतिबिंब. . .कॉलेजांत असतांना तूं मला शिकवत होतास. . .तुझी सगळीं रूपं मी या काजळपाण्यांत साठवली आहेत. . .सागराच्या तळाशीं मोती असतात नाऽ. . . बघ तर एकदां. . .फक्त एकदांच. . .'

याचनेनं व्याकुळलेले डोळे सुहासिनीनं माधवसमोर धरले. . . काजळपाणी साकळून गेलं तिच्या डोळ्यांत. . .तिच्या डोळ्यांत आपली रूपं पहातां पहातां माधव स्वतःला हरवून बसला. . .

सुहासिनी याचना करीत होती. . .'एकच क्षण. . .फक्त एकच क्षण. . .माधव तूं माझा हो. . . हें मागणं पुनः मागणार नाही. . . एका क्षणाच्या तृप्तींत अनंताची तृप्ती मला मिळेल. . . या डोळ्यांत तुला याचना दिसेल. . .लाचारी दिसेल. . .विझलेल्या ज्योतीसारखे दिसूं लागतील तुला हे डोळे. . .बघ. . .'

आणि मग मोहांत हरवलेल्या क्षणीं माधव सुहासिनीच्या डोळ्यांत पाहूं लागला. . .खूप खोल खोल. डोळ्यांच्या डोहांत बुडून गेला. . .

'इतकी वाट तरी कशाला पाहिलीस?'. . .

'कळलं नाऽ तुला. . .हवं तें सारं मिळालं. मला. . .आतां कांही नको. . . सात जन्म कांही नको. . .'

पारा जसा अदृश्य व्हावा तशी सुहासिनी निघून गेली. . . जें तिचं होतं तें माधव जवळ ठेवून गेली. . .बहर. . . मोहर. . . सुगंध. . .

सुगंधाच्या स्मृतींत माधव तरळत होता. मोहरत होता. . . बहर त्याला फुलवितच होता. एका क्षणांत दिव्य कांहीं मिळालें. . . एका क्षणांत दिव्य कांहीं हरपलें. . .कायमचें. . . तें हरपल्याचें कायमचें दुःख त्याच्या मनाला होणार होतें. . .त्या दुःखाची सांवली त्याच्या संसारावर पडणार होती. . .

माधवचें मालतीशीं लग्न झालें. देवा ब्राह्मणांच्या साक्षीनें मालती त्याची झाली. . . त्यांच्या लग्नाचा सोहळा सुहासिनीनं मोठ्या आनं-दानं, अभिमानानं पाहिला. . .डोळे भरून. . .

आणि एक दिवस डोळे मिटून मृत्यूच्या मांडीवर शांतपणें झोपी गेली. . .

तिच्यासाठीं माधवला खूप खूप आकांत करावयाचा होता. . . दुःख करायचं होतं. . . शोक करायचा होता. . . पण मालतीसमोर मोकळेपणानं त्याला रडता येत नव्हतं. . .

मालती मात्र ओक्साबोक्सी रडली. . . दोन्ही हात माधवच्या गळ्यांत टाकून तिनं आकांत केला...

'माझी जिवाभावाची मैत्रिण... माझी बहीणच गेली आज...'

माधव मालतीचं सांत्वन करीत होता. भावनांचा प्रलय मुठींत घट्ट आवळून. . . 'व्हायचं तें होऊन गेलं. . . आपल्या कां हातांत आहे. . .'

"नाही कळायचं तुला. . .'

मालती आकांत करीत होती. माधवला आकांत करतां येत नव्हता. . .

सुहासिनीच्या मृत्यूचं दुःख मालतीला झालं. . . कित्येक दिवस अहोरात्र माधव तिचं सांत्वन करीत होता. त्याच्या दुःखाला अव-सरच मिळाला नाही. . . त्याचें दुःख जिरून गेलें..

थाटलेल्या संसारांत माधव रमण्याचा प्रयत्न करीत होता. . . मिनीच्या जन्मानंतर सुहासिनीची आठवण मनाच्या खोल तळघांत रुतून बसली. . .

माधव मालतीला जपत होता. . .मालती माधवला जपत होती. .'.

सुहासिनीचा विषय कधीं कुणी काढला नाही.

परवां. . . परवां माधवला झोपेंत सुहासिनीचे डोळे दिसले. . . . तो झोपेंतून दचकून उठला. त्या दोन डोळ्यांची त्याला विलक्षण भीति वाटली. रात्र रात्र तो आतां जागत बसतो. . .

त्याची झोप उडाली. . . झोप यावी म्हणून त्याने अनेक उपाय

केले. झोपेच्या गोळ्या घेतल्या पण गोळ्यांवरहि जणुं सुहासिनीच्या डोळ्यांचा अंमल आहे. . .

मालती त्याला रोज विचारते. . . 'रात्रीं किती वेळ जागतां ?'

'छे ! लवकर तर झोपतो. . ."

या उत्तरानं मालती उदासीन होते. माधव अस्वस्थ होतो. . . त्याला वाटतं. मालतीला हें सांगून टाकावं. . .

पण सांगणार काय ?

मालती म्हणाली असती. . .प्रेम होतं तुमचं तर माझ्याशीं लग्न कां केलंत ?

माधव नुसताच अस्वस्थ झालेला आहे. . .

आज मालती माधवला म्हणाली. . .'हें असं किती दिवस चालणार?'

'काय ?'

'रात्रीचं जागणं. . .'

'कुणी सांगितलं. . .'

'तुमचे डोळे. . .'

'मुळीच नाही. . .

'किती दिवस लपवणार ?'

'काय ?'

'मीच सांगू ?'

'सांग ना ऽ. . .'

'तुम्हाला दोन डोळे दिसतात झोपेंत. . .'

'मालू ऽऽऽ. . .'

'ओरडूं नका. . . मला माहीत आहे.'

'नाही. . .'

'डोळे दिसतात तुम्हाला."

'नाही. . . नाही. . ! . . .'

'बोलूं द्या मला.. तुम्ही सांगत नाही.. मी सांगते..'

अवाक् होऊन माधव ऐकतच राहिला.

'. . .त्या दिवशीं...लग्नाच्या वाढदिवशीं मला सुहासिनी दिसली... स्वप्नांत... अभिसारिकेचा साजशृंगार करून आली होती... केस विस्कटलेले होते...वेणींतली फुलं चुरगळलीं होती... सुहासिनी मला म्हणाली... मालती... मला माधवला भेटायचं गऽ... एकदां तरी भेटावसं वाटतं.. पण कशी भेटूं त्याला ?... मी तिला सांगितलं.. भेट नाऽ... केव्हांही ये भेटायला. माधव... माधव फार चांगला आहे... भेटेला तुला... पण खरं सांगू सुहासिनीला तुमची भीति वाटते... ती आली तर तुम्ही लपून बसाल... नाहीतर.. नाहीतर तिच्या सौंदर्यानें धुंद व्हाल... मग मला विसरून जाल...मिनीला विसरून जाल. !... मी तिला खुप सांगितलं... ये. . तूं ये...पण ती म्हणाली.. नको.. सदेह माधव समोर यायला नको.. तो धुंद व्हायचा.. मी भेटेन माधवला, पण... पण त्याला फक्त माझे डोळेच दाखवीन... मला फक्त त्याला डोळे भरून पहायचं आहे... डोळे होऊनच मी त्याला पाहीन. काजळपाण्यांत त्याचीं रूपं मी त्याला दाखवली होती... माधव मला हवा आहे... फक्त एका क्षणापुरता... बघूं मी... सांग नाऽ... बघू...! तुम्हाला सुहासिनीने डोळे दिसले नाऽऽ...'

'मालती...'

'खरं नाऽ...'

'त्या डोळ्यांची भीति वाटते...'

'तुमचं प्रेम होतं ?'

'नको गऽ असं विचारूस...'

'पण तिचं तुमच्यावर प्रेम होतं.'

'हो ऽ..'

'लग्नापूर्वी सुहासिनी साजशृंगार करून तुम्हाला भेटली होती...'

'सांगितलं कुणी ?'

'सुहासिनी म्हणाली होती... माधवर माझं प्रेम आहे... पण त्याचं आतां तुझ्याशीं लग्न होणार आहे. त्याच्यासाठीं मला साजशृंगार करायचा होता.. पण... पण आतां ती वेळच येणार नाहीं... एकच क्षण मला मिळाला तरी मी माझा शृंगार घेऊन जाईन त्याच्याकडे... फक्त डोळ्यांतल्या काजळपाण्यांतचं प्रतिबिंब त्याला दाखवीन...'

'मालू ऽ...मालूऽऽ... हें सर्व तिनं तुला सांगितलं ?'

'हो ऽ... मीच तिला सांगितलं...'

'काय ?'

'जा तूं साजशृंगार घेऊन माधवकडे...'

'काय... काय केलंस तूं हें ?'

'एका क्षणापुरता लाखमोलाचा त्याग..'

'मालू ऽऽ..'

'पुनः ते दोन डोळे दिसले नाऽ तर घाबरायचं नाहीं.. सुहासिनीचे डोळे आहेत ते. अजूनही त्या डोळ्यांत काजळपाणी आहे...काजळ-पाण्यांत तुमचं प्रतिबिंब आहे... ते डोळे दिसले कीं बघा...तुम्ही अस्वस्थ झालात तर सुहासिनीला काय वाटेल...'

ऐकतां ऐकतां माधवनं डोळे मिटून घेतले...मिटलेल्या पापण्याच्या खालीं खोल खोल प्रकाश होता...माधव आपले डोळे घट्ट घट्ट मिटून घेत होता..

असा चमत्कार कधीं झाला नव्हता...

एका डोळ्यापुढें माधवला मालती दिसत होती...दुसऱ्या डोळ्या-पुढें सुहासिनी दिसत होती...

माधव घट्ट घट्ट डोळे मिटून घेत होता...प्रकाश अधिकाधिक वाढत होता.... दोन डोळ्यांपुढें दोन प्रतिमा उजळत होत्या..

'मालती ऽ...'

'घाबरूं नका...असं म्यायचं नाही...सुहासिनी आली नाऽ ..घ्या तिला जवळ...अन् पहा तिच्या डोळ्यांत...' ●●●



अनुक्रमणिका






**"कलाकृति" कधीं जुनी होत नाही. 'माझा प्रवास' ही साधी प्रवास कथा नाही. एक सामान्याने अवलोकिलेल्या ह्या 'जीवना'ला नकळतच कला स्पर्शून गेली आहे. गोडसे भटजींच्या त्या 'जुन्या प्रवासाचे' नवे (ताजे) रसग्रहण! डॉ. मालशांसारख्या रसिक व सहृदय लेखकाने केलेले !!........**




—डॉ. स. गं. मालशे

संख्येच्या दृष्टीने मराठींत प्रवासवर्णने कमी नसली, तरी गुणवत्तेच्या दृष्टीने हा वाङ्मयप्रकार विशेष समृद्ध आहे, असे म्हणवत नाही. याचे प्रमुख कारण या लेखनप्रकाराकडे पाहण्याचा आपला पारंपारिक दृष्टिकोन! पूर्वींच्या काळी लोक यात्रेच्या निमित्ताने प्रवास करीत. या धार्मिक हेतूबाहेर पडून कोणी प्रवासवृत्त लिहून काढलेच तर ते बहुधा पुढच्यास ठेंच; मागचा शहाणा, या म्हणीतील हेतूनुसारच असे.' त्यातहि कोणी देशाटनाचा वृत्तांत लिहिलाच, तर तो जुजबी असे. दरदाम, स्थलास्थलातील अंतर, प्रवासातील अडीअडचणी यांचा पाढा वाचून पुढीलांस मार्गदर्शन करणे हाच त्यांमागीलहि हेतु असे. एखाद्याने रमणीयसारखे ठोकळेबाज शब्द वापरून स्थलवर्णने केली की, अगदी डोक्यावरून पाणी! अशा प्रकारच्या प्रवासवर्णनांची फलश्रुति म्हणजे आपल्या भौगोलिक ज्ञानात भर पडणे! प्रवासवृत्त म्हणजे भूगोल नव्हे, याची जाण आपल्याला अलिकडे आली. 'धुक्यातून लाल तान्याकडे' या अनंत काणेकरांच्या प्रवासवर्णनाने भूगोलविषयक पंचनाम्यापेक्षा व्यक्तित्वदर्शनाला महत्त्व दिले आणि प्रवासवर्णन या लेखनप्रकारला ललित वाङमयाच्या क्षेत्रात खेचून नेले. तदनंतर रा. भि. जोशी, प्रभाकर पाध्ये, पु. ल. देशपांडे, जयवंत दळवी, रमेश मंत्री, बाळ गाडगीळ इत्यादि लेखकांनी व्यक्तित्वनिदर्शक असे चटकदार प्रवासवृत्तलेखन केलेले आहे. या लेखकांची प्रवासवृत्ते आपापल्या परी उत्तम आहेत, हे मान्य करून सुद्धा, मला जर का कुणी विचारले की, मराठीतले चटका लावणारे प्रवासवृत्त कोणते, तर मी बेधडक उत्तर देईन: 'गोडसे भटजीं'चे 'माझा प्रवास'!

गोडसे भटजी हे कोणी कसलेले लेखक नव्हते. साधे भिक्षुक. चार पैसे गांठीला लागावे म्हणून ते काकांबरोबर उत्तर हिंदुस्थानात गेले. पण योगायोग असा की, ते सत्तावनी क्रांतीच्या धोक्यांत सांपडले. मूळ वस्तूची अंगभूत झळाळीच अशी बावनकशी की, वरच्या मुलाम्याची गरजच पडू नये आणि Honest tale speads best; by being plainly told या शेक्सपीयरच्या वचनाचा प्रत्यय यावा! त्यांच्या प्रवासवृत्तांमधला एकच प्रसंग विस्ताराने देतो. झांशी कशी पडली त्याचे 'चक्षुर्वैसत्यम्' चित्र रेखाटल्यानंतर तीन दिवस इंग्रजांनी बिजान (कत्तल) आणि चार दिवस लूट केली. या काळात ते ज्या एका विलक्षण प्रसंगात सांपडले, त्याचे हे वेधक चित्र पाहा:—

"....काही वंड्यात म्हणजे भिंतीतील चोर कोनाड्यात चार चार माणसे बसली होती. आम्ही वंड्यांत जाऊन बसल्यावर एका घटकेने साफ उजाडून चोहोकडून बंदुकींचे शतावधि आवाज होऊ लागले. दर आवाजास एकेक मनुष्य मेला असेल असे मनांत आले म्हणजे अंगावर रोमांच उभे रहात. हरहर! काय इंग्रजी शिपायांचा दुष्टपणा! निरपराध दीन लोकांस दुसऱ्यांच्या पापाबद्दल किती शासन हे...! याप्रमाणे विचार करीत वंड्यांत अडचणीत बसलो असता, बारा वाजायच्या सुमारास मजला अतिशय तहान लागली. अगोदरच वैशाखाचे दिवस, त्यात जेथे वारा नाही, अशा अगदी कोंदट

जागत दाटीत बसलेलो, शिवाय ऐन दोन प्रहरचा वेळ आला होता; अशा अनेक उष्णतेच्या कारणांनी अगोदरच भीतीने शुष्क झालेल्या कंठास अत्यंत कोरड पडली. ती इतकी पडली की, अंगातील रक्त शोषून गेले...परंतु मला बाहेर जाण्याचा धीर होईना. शेवटी येथे बसून तरी प्राण जाणार, मग तृषा भागवून कां जाईना, असे वाटून जवळ आसपास कोठे आवाज होत नाही, अशी संधि पाहून वंड्यांतून बाहेर पडलो. धांवत धांवत विहिरी-वर येऊन मडके तोंडास लावले. घोट, दोन घोट पाणी घशा-खाली उतरते न उतरते इतक्यात जवळच्या वाड्यात वंदुकीचा आवाज झालेला कानी पडला. जिवाची आशा मनुष्यास कधीहि सुटत नाही. मडके हातातून टाकून धांव ठोकली, तो घोटाळून जाऊन आमच्या वंड्याचा रस्ता चुकलो. तेव्हा माझे हातपाय कापू लागले व सैरावैरा इकडे तिकडे घाबरून धांवत सुटलो. इतक्यात एका वंड्याचे तोंड दृष्टीस पडले. त्यात डोके घालून शिरण्यास लागतो तो आत दोघी तरुण बायका दृष्टीस पडल्या. त्यानीहि मोठ्या घाईने आत लवकर या, असे सांगितले. ती बंडा फार लहान असल्यामुळे आत दोघा बायकांसहि पुरेशी जागा नव्हती. परंतु त्या कोमल अंतःकरणाच्या स्त्रियांनी अडचण सोसून मला आत घेतले. त्यांची तोंडे पश्चिमेस होती व मी आत शिरून फिरावयास जागा नव्हती. म्हणून माझे तोंड पूर्वेस होते. याप्रमाणे तोंडास तोंड लावून उराशीं ऊर लावून आम्ही बसलो. पुढेच जी स्त्री होती तिचे सर्व अंग घामाने भिजलेले होते. त्या वेळेस माझे वय सुमारे ३० वर्षाचे असावे व त्या स्त्रीचे वय १८ वर्षाचे असावे. अशी तरुण स्त्रीपुरुषे एकमेकांशी घट्ट मिठी मारून बसली असताहि कामवासना उत्पन्न झाली नाही, हा भयंकर मृत्युभीतीचा प्रवाह म्हटला पाहिजे. सहासात घटका झाल्यावर जवळ आसपास कोठे आवाज होत नाहीत असें पाहून मी त्या वंड्यातून बाहेर पडलो आणि आपल्या वंड्यात जाऊन बसलो. मला परत आलेला पाहून काकांस परमावधि आनंद झाला. त्यांस मी मारला गेलो असे पक्के वाटून अति शोक उत्पन्न झाला होता. असो. याप्रमाणे परमेश्वराच्या दयेने... तो दिवस पार पडला.''

हा मूळ प्रसंगच एवढा बोलका आहे की, त्यावर आणखी भाष्य न करणे बरे.

सत्तावनी बंडाबाबतची आगाऊ कुणकुण त्यांच्या कानावर महूच्या छावणीत पडली. शिपाई बोलत होते की, आता मारामारी होणार ! या मंडळीने कारण विचारता त्यांनी उत्तर दिले, "गोष्ट अशी झाली की, एक ब्राह्मण शिपाई स्नानास गेला असता एका चांभाराने त्याजपाशी लोटा पाणी पिण्यास मागितला. ब्राह्मण म्हणू लागला की, मी लोटा दिला तर तो विटाळेल. हे ऐकून तो रागाने म्हणाला, तुम्ही जात, जात म्हणून फार उड्या मारू नका. हल्ली काडतुसे तयार करतात त्यांस गाईची व डुक-राची चरबी लागते ती आम्ही तयार करतो. ती काडतुसे तुम्ही दातांनी तोडलीत म्हणजे गाईची चरबी तुमच्या तोंडात जाणार... ते समयी लोक बोलू लागले की, आम्ही मरू पण बेधर्मी होणार नाही.'' या हाणामारीत तुम्ही पुढे जाऊ नका, असे शिपाई लोक या प्रवाशांना म्हणाले. त्यावर गोडसे भटजींनी सांगितले, "आम्ही गरीब ब्राह्मण, आम्हाला कोण कशाला मारील.'' पण गोडसेभट-जींचा हा विश्वास व्यर्थ होता. वर विस्ताराने वर्णन केला, तसें प्राणावरचे प्रसंग कित्येक आलेच; नागवणूकहि बरीच झाली; पण या सर्व दिव्यामधून सहीसलामत सुटून ते जवळजवळ तीन वर्षांनी पुन्हा वरसईस आपल्या घरी परत आले.

या वृत्तांतात बंडाचे वर्णन विस्ताराने यावे, हे साहजिकच. सारी हकीकतच मोठी चित्तथरारक आहे. प्रा. न. र. फाटक, श्री. का. न. केळकर यांसारख्या इतिहासाभ्यासकांनी ही हकीगत ठोकळमानाने प्रत्यंतर पुराव्याच्या कसोटीला उतरणारी आहे, असा निर्वाळा दिलेला आहे. मात्र या हकीगतीप्रमाणे फारशी विवेचक दृष्टि नाही. राजकारण, समाजकारण, धर्मकारण याविषयी जागरूक असणाऱ्या व्यक्तीने ही हकीगत लिहिलेली नाही. परंतु ह्या वर्णनांत अनुभूतीचा आगळा कस आहे, प्रांजळ-पणा आहे. निवेदनाची तऱ्हा संस्कृतच्या अंगाने जाणारी असली, तरी विद्वज्जड नाही. मराठमोळा, ठाकठिकीची आहे. अनेक प्रसं-गांना जो चित्तवेधकपणा लाभलेला आहे, त्याचे एक कारण म्हणजे लेखकाचा मनमोकळेपणा! त्यांनी प्रांजळपणे सांगितलेला हा एक प्रसंग पाहाः—

एकदा या चुलत्यापुतण्यांनी स्वयंपाकाची तयारी केली. पण कोठे विस्तवच आढळेना. कोणी माणूसहि भेटेना. इतक्यात एक प्रेतयात्रा त्यांना दिसली. तेव्हा गोडसेभटजी मडक्यातला विस्तव मागू लागले. मडकेवाला विस्तव देईना. तेव्हा त्यांनी शास्त्रार्थ सांगितला की, हा अग्नि स्थंडिलावर अजून स्थापित झालेला नाही, सध्या तो लौकिकाग्नि आहे. हा शास्त्रार्थ पटून त्यांना विस्तव मिळाला !

प्रवासवृत्तांताच्या प्रारंभी मालेगांवासच एका ब्राह्मणाला सर्पदंश होऊन, तो मरतो, त्याचे करुण चित्र पाहायला मिळते. बांद्याच्या वाटेवर असताना उन्हाची तिरीप लागून काका बेशुद्ध होतात, आणि त्यांना तसेंच टाकून बरोबरचे प्रवासी ब्राह्मण सोडून जातात. अत्यंत दाट जंगलांत एकटच्या गोडसेभटजींची परिस्थिति अगदी असहाय्य होते. शेवटी एक अशिक्षित गाडीवान् देवासारखा भेटून त्यांची सुटका होते. हा प्रसंगहि काळजाला अगदीं पीळ पाडतो !

झांशीच्या राणीच्या आश्रित म्हणून राहाण्याची संधि लेख-काला लाभली असल्याने तेथली हकीगत जशी विस्तृत तशीच प्रत्ययकारी उतरलेली आहे. या हकीगतीत झांशीची राणी आणि तिचे पति यांची दिनचर्याहि आली आहे. झांशीवालीच्या बाल-पणाविषयी लेखकाने म्हटले आहे, "याप्रमाणे श्रीमंती सुखात रुळलेली व ज्याने त्याने लाड केलेली ती मुलगी शरीराने दांडगी








होऊन अकरा बारा वर्षांचे सुमारास पित्यास लाज आणू लागली." झांशीच्या राणीच्या लक्ष्मणराव दिवाणजींचे अक्षर-शत्रुत्व लेखकाने मिस्किलपणे टिपले आहे. झांशीच्या पूर्ववृत्तांतातील कित्येक वर्णने लेखकाच्या विचक्षणतेची साक्ष पटवणारी आहे. लक्ष्मीबाईची दिनचर्या, तिचा पुरुषी वेश, तिच्या नवऱ्याचा षंढपणा, तिच्या स्वारीचा थाट, तिची अश्वपरीक्षा, तिची दयाशीलता, हरिदासपुराणिकांना तिने दिलेला आश्रय, तिची अगतिकता, तिचे शौर्य या सर्व गोष्टींचे दर्शन त्याने उत्तम रीतीने घडविले आहे. झांशीच्या लढाईचे वर्णन इतिहासाशी इमान राखणारे आहे, असा इतिहासकारांचा निर्वाळा आहे. हे वर्णन किती बारकाव्याचे आहे ते पाहा: "किल्ल्यात वाडयाच्या गच्चीवर गोळा पडला म्हणजे तेथे तो फुटून मोठा आवाज होऊन त्याच्या सात आठ कपच्या उडत व त्या जवळच्या माणसांस जखमी करीत. नंतर तोच गोळा गच्ची फोडून त्याचे खालचे मजल्यावर आवाज होऊन पुन्हा फुटे व पुन्हा कपच्या उडोन शेजारचे माणसांचा प्राणघात करी. नंतर पुन्हा तक्तपोशी फोडून त्याचे खालचे मजल्यावर फुटून नासाडी करीत असे. शेवटी मोठा आवाज होऊन आतून खिळे, कातरी वगैरे छरे लाल झालेले उडून फार मनुष्ये जाया होत...एक दोन गोळे फुटल्यावांचून तसेच पडले होते, ते आम्ही वजन करून पाहिले ते साठ पांसष्ट पक्के शेर भरले." प्रत्यक्ष असे गोळे पडत असतांना लेखकाला चार घटका जीव मुठींत धरून मृत्यूच्या छायेखाली काढाव्या लागल्या होत्या.

झांशीवालीने केलेला दानधर्म, अनुष्ठाने, हळदीकुंकवाचा समारंभ याविषयी लेखकाने अगदी जिव्हाळ्याने लिहिले आहे. शिमग्याच्या मोसमात कोंकणातून एक नाटकमंडळी झांशीस आलेली होती. तिच्यासंबंधी म्हटले आहे, "बाईसाहेबांनी त्यांस (नाटकवाल्यांस) सरकारांतून शिधा चालू करवून किल्ल्यात पुष्कळ नाटके करविली. एकदा हरिश्चंद्राचे आख्यान झाले, त्या वेळेस सदोबा नाटकवाला याने विचारिले की, या नाटकात डोंबाचे घरी हरिश्चंद्राचे डोक्यावर मडके फोडावे लागते, तर त्याजबद्दल परवानगी असल्यास मडके आणवून फोडीन. त्यावर विचार होऊन बाईसाहेबांनी परवानगी दिली. परंतु जेव्हा नाटकात बैठकीवर घागर फोडली तेव्हाच वृद्ध मंडळी बसली होती त्यांस हा अपशकून आहे असा चरका बसला."

तत्कालीन लोकसमजुतीनुसार शकुनापशकुनांचे उल्लेख या प्रवासवृत्तांत पुष्कळदा येतात. ब्रह्मावर्तीच्या पेशव्यांची हकीगत मोठी प्रत्ययकारी रीतीने वर्णिलेली आहे. ब्रह्मावर्ताचा निरोप घेऊन पेशवेमंडळीनी जी निरवानिरव केली आणि अमोल रत्ने आणि जडजवाहीर गंगार्पण केले, त्याचे वर्णन वाचताना, स्वतःच नौकेत बसलेले असून तो सारा करुण देखावा आपल्या नजरेसमोर प्रत्यक्ष घडत आहे, असा भास वाचकाला होतो. मात्र, येथेहि, ब्रह्मावर्ताबाहेर पडत असताना पेशव्यांना कसकसे अपशकून झाले, त्याची इत्थंभूत यादी सादर करण्यास लेखक विसरत नाही. लेखकाची वृत्ति जशी चौकस आहे, तशीच ती दुसऱ्या बाजूने भाविक आहे. झांशीच्या त्या झंझावातात कोणी अशौच पाळले नाही, अशी नोंद करण्यास तो विसरत नाही. सातपुड्यातील वेलांचे रान पाहून तो एक साहित्यिकासारखे वाक्य लिहून जातो; "चांदण्याच्या प्रकाशाने वनप्रदेश संसारसुखाच्या आशेप्रमाणे अस्पष्टरमणीय दिसत होता व अहंपणारूप सुवासाने वन दणाणून सोडले होते" यातले अलंकरण भाविकतेची डूब घेऊन आले आहेच पण त्याला हे वन पाहून खरा आनंद झाला त्याचे कारण म्हणजे ते 'शिवप्रिय वृक्षवन' होते! ब्रह्मावर्तीचे पूर्ववृत्त कथन करताना दुसरे बाजीराव आणि त्यांची पत्नी सरस्वतीबाई यांचे संसारचित्र चारदोन वाक्यातच रेखाटलेले आहे; पण ते मनात भरते. राणी लक्ष्मीबाईला आणि स्वतःलाहि होष्यमाण आगाऊ सुचविणारी स्वप्ने कशी पडली, त्याचे चित्रण दोनतीन स्थळी केलेले आहे. हे चित्रण भयकातरतेचे वातावरण डोळ्यापुढे उभे करणारे उतरले आहे. लेखकाच्या चुलत्याची प्रकृति एकदम बिघडली, तेव्हा लेखकाने मुद्दाम त्याला ध्रुवनक्षत्र दाखविले, कारण ध्रुवनक्षत्र पाहिले की, सहा महिने मृत्यूचे भय नसते!

आपल्या भाविक वृत्तीनुसार लेखकाने ठिकठिकाणचीं क्षेत्रे आणि दानधर्म यांचे सुरस वर्णन केलेले आढळून येते. बुंदेल खंडातील सूर्ययंत्र (पृ. १२०) आणि हनुमंत गडावरील वानरांना लाडवांचे भोजन घालण्याची पद्धत (१३०) यांची वर्णने अद्भुत वाटतात. भिक्षुकीचा पेशा असल्याने लेखकाचे दानकृत्यांकडे लक्ष्य विशेष. धारानगरीच्या राजाच्या मृत्यूनंतर तेथे केलेल्या दानधर्माचे वर्णन विस्ताराने करण्यात आलेले आहे. इतर अनेक दानांबरोबर तेथे चार घोडे, तीन उंट, दहा बैल, नऊ म्हशी आणि तेरा दासी दान म्हणून दिल्या गेल्या. शय्यादान घेणाऱ्या ब्राह्मणास दानगृहातून बाहेर पाठवून दिला की, त्याची छी थू होई, दासी दान घेणाराची तर कोण फजीती! "एखाद्या सुंदर सर्वालंकारयुक्त अशा दासीचा पदर एखाद्या गरीब बावळ्या ब्राह्मणाचे धोतराशी बांधून त्याची दरवाजाबाहेर धिंड निघाली म्हणजे लोकांच्या चावट थट्टांनी व शेणमारांनी त्याची दुर्दशा होऊन जाई. तशात ती दासी लुच्ची असली, म्हणजे त्या ब्राह्मणाबरोबर झरझर चालेनाशी झाली की, ब्राह्मण गयावयां होई." अशा मिस्किल निरीक्षणाचे नमुने या छोटयाशा पुस्तकांत कितीतरी आहेत.

गोडसे भटजी हे भाविक भिक्षुक असले, तरी कोणी व्रतस्थ कापडी किंवा मुमुक्षु यात्रेकरू नव्हते. धर्मकृत्यात बरेच पैसे उडवले, तसे हौसमौजेत उडवले नाही, म्हणून आयोध्येची यात्रा करताना ते लखनौची सहल करून येतात. प्रा. न. र. फाटक यांनी कै. वैद्यांनी गाळलेल्या मजकुरासंबंधीं जे परिशिष्ट द्वितीयावृत्तीला जोडले आहे, त्यात पृ. १४६ वर या लखनौसहलीचे संक्षिप्त वर्णन येते. त्यावरून आपणहि एकदा रंगढंग लुटावा, अशी इच्छा या प्रवासांत गोडसे भटजींना झालेली होती, हें दिसून येते. याची चुणूक दाखविणारीं ही वाक्ये पाहा: 'स्वइच्छ नाचबैठकी पाहून सुख भोगून मौज केली'.... 'उत्तम माडी-





वर परभारे जाण्यायेण्यास वाट अशी जागा भाडचाने घेतली . . .' 'यवनी स्त्रियांची गाणी बहुत ऐकली, पैसा त्यात बराच खराब केला.' . . . .'फार चैन होत असे.'

पेशा भिक्षुकीचा असल्याने प्रवासकर्त्याची स्त्रीविषयक चौकसता जागृत आहे, असा निर्वाळा दुसऱ्या आवृत्तीचे संपादक प्रा. न. र. फाटक यांनी दिला आहे. आणि त्यांनी, पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीत संपादक कै. चिंतामणराव वैद्य यांनी न दिलेली काही चौकस प्रकरणे परिशिष्टात दिली आहेत. झांशीच्या राणीचे यजमान तृतीय प्रकृतीचे होते व ते मासिक पाळी धरीत असत इ. मजकूर परिशिष्टांतच वाचावयास मिळतो. हुशंगाबादेस गौड ब्राह्मणाच्या टाकलेल्या तरुण मुलीने खुद्द लेखकावर आणलेला प्रसंग आणि त्याने पापभीरुपणे करून घेतलेली आपली सुटका (पृ. १५२) तसेच काशीतील तऱ्हेवाईक आचार (पृ. १४८) ह्यांचे परिशिष्टांतील उल्लेख असेच मासलेवाईक आहेत. प्रयागहून ब्रह्मावर्ती आल्यावर सासूसुनेचा घरात चाललेला 'जबर कज्जा' लेखकाला ऐकायला मिळतो. सून म्हणत होती,"आम्ही गंगास्नानास जातेसमई ऐखाद मित्राकडे जातो. पूर्वी तुमचे उमेदीत घरात चोळी लुगडे सोडून टाकून जिन्यानी माडीवर जाऊन दिवाणखान्यात चार पांच मंडळी महाराज श्रीमंतापाशी बसली असता तेथे येऊन सर्वांस नमस्कार करून खुंटीवर ठेवलेली पैठणी घेऊन त्याजसमोर नेसून चोळी घालून त्या मंडळीत श्रीमंत सांगतील त्याचे मांडीवर बसून विडा खात असा, असा तर आमचा धिंगाणा नाही" ह्यावर प्रवासकर्ता म्हणतो, "इ. भाषणें ऐकून फार मौज वाटली."

सत्तावनच्या बंडात झांशीवाली वगैरेंचा जो पराभव झाला, त्याची लेखकाची मीमांसा भाबडचा पापपुण्यकल्पनांवरच आधारलेली आहे. झांशी—ब्रह्मावर्त वगैरे नगरांची इंग्रजाने बेचिराखी केली, त्यावेळी लेखकाला वाटले की, हे सारे पूर्वपातकामुळेच घडत आहे. झांशी हा बुंदेलखंडाचा भाग. बुंदेलखंडात पाप अनावर झालेले. तेव्हां प्रायश्चित्त म्हणून सारे घडले, असे लेखकाचे म्हणणे आहे. तो म्हणतो, "बुंदेलखंडाचे पाणी पुरुषास चांगले नाही. तेथें षंढ फार निपजतात. शेंकडा पंचवीस षंढ समजले पाहिजेत." स्त्रीच्या मनात भरलेला पुरुष स्त्रीचा नवराच तिला मिळवून देई असे परिशिष्टांत नमूद केलेले आहे. (पृ. १४०), बुंदेलखंडात थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीत नारायणशास्त्री नामक एका शास्त्र्याने भंगिणीच्या देखण्या मुलीशी ठेवलेल्या संबंधांतून निर्माण झालेल्या खेंकटयाची हकीगत पृ. ५२ वर वाचावयास मिळते. या शास्त्रीबुवाची शेवटी चौकशी व्हावयाची वेळ येऊन ठेपली. शास्त्रीबुवानी पाहिले की, त्या भंगिणीशी इतरहि कित्येक प्रतिष्ठित ब्राह्मणांचा व्यवहार आहे. तेव्हा त्यांनी त्या भंगिणीस सांगितले की, तू आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येक ब्राह्मणाकडून द्रव्य न घेता त्याचे जानवे मागून घेत जा, तिने त्याबरहुकूम केले. पुढे चौकशी उभी राहाताच शास्त्रीबोवांनी सांगितले, "मीच तर काय, शेंकडों ब्राह्मण बाटले आहेत"—आणि त्यांनी भंगिणीच्या पोरीकडून पुरावा म्हणून जानव्यांचा जुडगा न्याय करणारांपुढे ठेवविला !

सामाजिक अधःपतनावर प्रकाश टाकणाऱ्या अशा कित्येक गोष्टी या प्रवासवृत्तात कथन केलेल्या आहे. समोरासमोर मृत्यु दिसावा आणि योगायोगाने सुटका व्हावी, अशा वेळा लेखकावर आल्या, कधीकधी 'अवधूत वैभवानिशी' सहीसलामत सुटावे, असे प्रसंग आले. अशा गोष्टींमुळे आणि भिक्षुकीच्या पेशामुळे लेखकाचा दृष्टिकोन दैववादी व्हावा, ही गोष्ट अनैसर्गिक नाही. झांशीच्या राणीसारख्या कर्दनकाळ बाईचा दृष्टिकोनहि अखेरीस तसाच बनलेला होता ! पळापळीनंतर काल्पीनजीक लेखकाला झांशीवालीचे पुनर्दर्शन झाले. या प्रसंगांचे वर्णन वाचताना खरोखर मनात कालवाकालव होते. 'तिने पठाणी पोषाक केला होता, व सर्व अंग धुळीने भरले होते. तोंड किंचित् आरक्त असून म्लान व उदास दिसत होते . . . तिला तृषा लागली होती . . ."मी रसी व मडके घेऊन लागलीच विहिरीत सोडणार तो बाईसाहेब म्हणाल्या की, तुम्ही विद्वान् ब्राह्मण, तुम्ही मजकरिता पाणी काढू नका. मीच काढून घेते." पुढे लेखक म्हणतो, "त्या मृण्मय पात्रातून ओंजळीने पाणी पिऊन तृषा हरण केली. दैवगति मोठी विचित्र आहे!" नंतर निराश मुद्रेने बोलल्या की, मी अर्धा शेर तांदुळाची धनीन, मजला रांडमुंडेस विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची काही जरुर नव्हती. परंतु हिंदुधर्माचा अभिमान धरून या कर्माला प्रवृत्त झाले व याजरिता वित्ताची, जीविताची सर्वांची आशा सोडली. आमच्या पदरीं पातकच फार म्हणून आम्हास ईश्वर यश देत नाही."

अशास्थितीत झांशीच्या लोकांच्या पदरी पूर्वदुष्कृत्यच मोठे असले पाहिजे; तिथे इंग्रज सरकारास अगर परमेश्वरास तरी काय म्हणून बोल लावावा, ही जर लेखकाची विचारसरणी असली, तर त्याचे आश्चर्य वाटू नये. झांशीप्रकरणाच्या शेवटी तात्पर्यार्थ सांगताना लेखक म्हणतो, "त्यावेळेस राजनीतीतील एका आर्येचे आम्हास स्मरण झाले. "अबला यत्र प्रबला बालो राजा निरक्षरो मंत्री। नहि नहि तत्र धनाशा जीविताशापि दुर्लभा भवति।।" अशी स्थिति झांशीस अक्षरशः होती."

एका मोठ्या ऐतिहासिक चित्तथरारक अनुभवाकडे छोटचा भिक्षुकी चष्म्यातून पाहात लिहिलेला हा 'माझा प्रवास !" एक जिवंत आणि उत्कट प्रवासवृत्त व निर्भय आणि प्रांजळ आत्मवृत्त!! किती दुर्मिळ चीज—आजच्या जाहिरातीच्या जगात! ! !

● ● ●





अनुक्रमणिका

नको त्याच्याशी
जन्मगाठ पडली. नको
ते आयुष्य
वाट्याला आले.
यातना–काळज्यांनी भरपूर
मारा केला
आणि
तरीही............



**-वसंत फेणे**

**दारात** पोंचलं कीं "यॉऽऽऽ तूं !" अशी जिव्हाळ्यानं भरलेली साद ऐकू येते. नि जिने चढल्याचा थकवा नाहीसा होतो. समईच्या ज्योतीसारखं प्रसन्न हास्य तोंडावर घेऊन पमाताई पुढे येते. बसायला सांगून म्हणते, "अब्बा! खूब्ब दिवस दिसलॉंच ना म्हरे पाप्या!"

पमाताईंची स्वागताची ही रीत जणुं ठरून गेल्यासारखी आहे, कितीहि लवकर त्यांच्याकडे फेरी टाका 'खूब्ब दिवस दिसलॉंच ना' ही त्यांची तक्रार कायम !

आपण थोड्याच दिवसापूर्वी आलो होतो असं सांगितलं तर त्या म्हणतील, "घोड्यावर बसून आयिल्लॉं तूं तेन्ना ! तानेबरोबर खावच्याकस् घॅतलें नाशिल्लें; हांव् विसल्लॅं ना!"

'ताने'बरोबर म्हणजे चहा-कॉफीबरोबर खायलाहि घेतल नाही म्हणजे काय आल्यासारखं तरी झालं? पमाताईंचा हा असा सवाल.

त्याला माझ्यासारख्या जवळ उत्तर नसतं. असतं मनात कौतुक. पमाताईंच्या या स्नेहाळ वृत्तीबद्दलचं.

चाळीत, नात्यागोत्यात नि साऱ्या परिचितात त्या पमाताई म्हणूनच ओळखल्या जातात. कदाचित् त्यांच्या व्यक्तिमत्वामुळे असेल. त्यांच्या नांवातहि निवांत शिवालयांतील घंटानादाचा गोडवा प्राप्त झाला आहे !

त्यांच्याबद्दलचा आदर नि कौतुक सार्वत्रिक. त्या गिरगावात गोवा-कारवारकडील लोकांचं केंद्र बनलेल्या चाळीत गेली कित्येक वर्षे रहातात. पण त्यांच्या 'अस्वडी' पमाताई तूं–ते तसलॅंच' असे उद्गार कुणी कधी काढत नाही.

कारण त्या कधी चाळकऱ्यांच्या हेव्यादाव्यांना बळी पडल्या नाहीत. पडल्या फक्त चाळकऱ्यांच्या उपयोगी. शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या उखाळ्यापाखाळ्यात त्या गुंतून पडल्या नाहीत. गुंतून पडल्या आपल्या चिंचोळ्या दोन खोल्यांच्या संसारात.

पमाताईंचा तो संसार! ! एके दिवशीं मी गेलो तेव्हां त्या घरी नव्हत्या. त्या संसाराची ओढगस्ती मला ज्ञात होती. परंतु त्यात एक प्रकारचा भकासपणा आहे; एक प्रकारची अवकळा त्यात आहे, हे कधीच लक्षात आल नव्हत. त्या दिवशी त्याची जाणीव झाली. अगदी विदारकतेने.

एका बाजूला देवदाराच्या खोक्याचा आधार देऊन उभा केलेला पलंग. त्यावर जुनीच गादी. त्यातून दरिद्री माणसाच्या लाचारीसारखा बाहेर डोकावणारा कापूस ! एक जुनी ट्रंक, जख्खड म्हाताऱ्या सोवळ्या बाईसारखं आपलं अंगचोर नि कालातीत अस्तित्व अपराधीपणानं घेऊन कोंपऱ्यात उभी होती. त्याला लागून देवदाराचा उभा खोका. त्यात दोन आडव्या फळ्या. नि त्यांवर कपडे. ट्रंकेत कुटुंबियांचे ठेवणीचे कपडे असावेत. ट्रंकेच्या वर भिंतीला टांगलेला शांतादुर्गेचा फोटो नि त्याखाली एक बारीकशी फळी !

एरवी प्रसन्न नि लखलखीत वाटणारा शांतादुर्गेचा चेहरा-

देखील दुर्मुखलेला होता. बिचारीनं तुपाची वातहि कित्येक दिवसांत पाहिली नसावी.

अडगळीच्या एखाद्या खोलीत असलं सामान असतं. तरी असा जुनाटपणा, अगतिकपणा खोली व्यापून ओसंडत नाही.

त्या कॉटवर जुना वृत्तपत्राचा अंक वाचीत बसले होते पमाताईंचे यजमान. त्या खोलीतील अवकळेचे नि अगतिकतेचे मूर्तिमंत प्रतिक !

मला या माणसाची कींव येई. नि त्यापेक्षां अधिक चीड. त्यांच्या शेजारी बसल्यावर खोलीतील विषण्णतेच्या डोहांत

# पमाताई

मला बुडाल्यासारखें वाटलें. वाटत होतं यातून बाहेर पडावं–सुटका करून घ्यावी.

तेवढ्यांत पमाताई आल्या. पारिजातकाच्या पखरणीवर हळुवार पाऊलें टाकीत श्रावणांतली पहाट उगवावी तसें झालें. त्यांच्या पदरवानें अगतिकपणा कुठें पसार झाला. त्यांच्या स्मितानें विषण्णता विरून गेली. ओढगस्ती दडून बसली. नि श्रावणांतल्या ओल्या पहाटेसारखा स्नेहाळ ओलावा सर्वत्र पसरला !

पमाताईंच्या चेहऱ्यात एक विलक्षण कांति आहे–चेहऱ्याभोंवती तेजाचं वलय आहे असं भासविणारी. देवादिकांच्या तसबिरींत दाखवितात तशी. आसमंत उजळून काढणारी. त्या चिंचोळ्या दोन खोल्यांतील दारिद्र्य, औदासिन्य लपवणारी. पमाताईंचे यजमान तेथें असले तरीहि !

पमाताईंचे यजमान ! मला खूप खूप वेळां वाटलंय् पमाताईंचं लग्न या गृहस्थाशीं व्हायला नको होतं. एखाद्या सधन बंगल्याची मालकीण म्हणून त्यांनीं वावरायला पाहिजे होतं. त्यांच्या अंगच्या सोनकांतीला साजेसे सोन्याचे चार डाग लेवून. मग चार ओळखी-पाळखीच्यांना त्यांच्याकडे आश्रय मिळाला असता; आज करकचून आवळलेली त्यांची उदारवृत्ति सढळ हातानें वावरूं लागली असती. आणि बहुधा दोन खोल्यांत कोंडलेलं त्यांचं शालीन नि प्रसन्न हास्य घरंदाज मोकळेपणानं चार ठिकाणी फुललेल्या अशोकासारखं दिसलं असतं.

पण हें सारं त्यांचं लग्न एखाद्या कर्तबगार पुरुषाशीं झालं असतं तर !

चार परिचित घरीं आले तर कधीं कधीं पमाताई आठवडाभर चहाशिवाय काढतात. नि पाहुण्यांना चहाबरोबर 'खावच्याक' दिलेलं असलं तर विचारायलाच नको! ही परिस्थिती पमाताईंवर आली त्यांच्या यजमानामुळें !

गंमत म्हणजे गृहस्थ चांगला जुना बी. ए. जवळचे दूरचे नातलग चांगल्या हुद्यांवर. पण याला कांही कधीं चांगली नोकरी मिळाली नाहीं नि मिळालेली फार दिवस टिकली नाही. असं कां होतं, कसं होतं तें कुणालाच कधीं समजलं नाही. खरं म्हणजे 'ते नोकरीवर फारसे टिकतच नाहीत' असं म्हणून तें समजून घेण्याचा कुणी तसा प्रयत्नहि केला नाही.

वास्तविक पमाताईंचं माहेर तसं सधन. सासरहि खाऊन पिऊन सुखी. घराणं कुलशीलानं चांगलं. मुलगा चांगला बी. ए. झालेला. मुंबईत नोकरी पमाताईंच्या वडलांनीं सोयरिक जमविली. नि तेथूनच त्यांच्या होऊं घातलेल्या जावयाच्या रडकथेला सुरवात झाली !

मुहूर्त महिन्यावर आला. नि तेव्हांच त्यांची नोकरी सुटली ! पमाताईंच्या भावी सासऱ्यांनीं निरोप पाठविला, "मुलाची नोकरी सुटली आहे. फेरविचार करायचा झाल्यास हरकत नाही. मागून प्रवाद नको."

पमाताईंच्या वडलांनीं भावी व्याह्यांच्या या मोठेपणास साजेसं उत्तर बाणेदारपणानं पाठविलं, "सोयरीक जोडली ती कुलशील पाहून नि मुलाच्या स्वभावाविषयीं ऐकून. त्याला नोकरी कुठं आहे नि पगार काय मिळतो याची आम्ही चौकशी केली नाही. तरी ठरला मुहूर्त कायम करणें ही विनंति."

वडलांचं तें उत्तर ऐकून सौभाग्यकांक्षिणी पमाताईंचा ऊर पावसाळ्यांतल्या विहिरीसारखा अभिमानानें भरून आला. घरांतहि अभिमानाचं वारं दाटल्यागत झालं.

पमाताईंच्या वडलांनीं निरोप पाठविल्यावर अठरा वर्षाच्या पमाला विचारलं."पमा,चटल्याली नोकरी सुटली खंय. तरी धरिल्लों मूहूर्त कायम करपांक हावें सांगला. तुका पसंत आस म्हणों?"

वय विसरून पमानें "बाप्पा" म्हणून वडलांचा उजवा हात दोन्ही हातांनी पकडला. पुढे ती बोलूच शकली नाही. तिच्या गळ्यांत नि डोळ्यांत बाष्प दाटलं. क्षणैक नजर वडलांकडे लावून ती हंसली. अन् आंत पळाली. त्यांना ती धुक्यातून हसणाऱ्या सकाळीप्रमाणें वाटली. गृहीत धरलेला मुलीचा होकार मिळाला म्हणून त्यांना बरं वाटलं.

त्यांचं म्हणणं असं कीं, मुलाचे काके मामे चांगले आहेत; आपणहि कांही अगदी असेच नाही. मिळवून देऊं कुठेंहि चांगली नौकरी. मुलाला चांगली नौकरी कुठेंहि मिळेल; पण मुलीला चांगलं स्थळ इतकं 'सुसवाड' कसं मिळेल?'

पमाताईंच्या वडलांचं म्हणणं रास्तच होतं. मग प्रत्यक्षांत तसं कांहीं घडलं नाही. मुलाचे काके मामे पावले नाहीत म्हणा अगर इतर कांही म्हणा पमाताईंच्या यजमानांना कधीं चांगली नोकरी मिळाली नाही. गेल्या दोन तपांत त्यांच्या डझनवारी नोकऱ्या झाल्या. अन् जवळजवळ नोकरी इतकाच काळ बेकारींत गेला!

गृहस्थ मुखस्तंभ म्हणावा इतका मुखदुर्बल. चारचौघांत कधीं मिसळला नाही. आल्यागेल्याशी फारसं काही बोलला नाही.










वाचनाचा मात्र शौकीन. वाचायला काहीही चालेल. रघु, मेघदूत, कुमारसंभव तल्लीनतेने वाचताना मी त्यांना पाहिलं आहे. अन् सामानाला बांधून आलेली रद्दी उत्सुकतेने वाचताना ते मला आढळले आहेत.

मुलांच्या अभ्यासाची पुस्तकं ते गंभीरपणे वाचतात. कोणत्याहि यत्तेचा इतिहास भूगोल ते वाचतात हे तर काहीच नाही; संस्कृतचं व्याकरण नि आठवल्यांचा आल्जिब्राहि ते मनःपूर्वक वाचतात!

कचेरीच्या वेळी बाहेर पडले की, समजावं नोकरी चालू आहे. घरीच पुस्तक घेऊन बसलेले आढळले म्हणजे ओळखावं नेमेचि येणारी पाहुणी आलीय् मुक्कामाला. मात्र बेकारी पाहुणचाराला आली तरी पमाताईंचं हास्य लपत नाही अन् कुणी घरी आला की, "यॉऽऽऽ तूं !" ही जिव्हाळ्यानं ओथंबलेली स्नेहाळ साद स्वागतास हजर असतेच.

नवऱ्याच्या नोकरीबद्दल किंवा बेकारीबद्दल त्या कधीं फारशा बोलत नाहीत. नवऱ्याविषयीहि नाही. मला मनांत वाटायचं रास्तच आहे. नवऱ्याविषयीं काय बोलणार त्या? आपल्याला जे समजतं ते त्यांनाहि अंतर्यामी वाटत असणारच. पण मला कौतुक वाटे ते अशासाठी की, त्या त्यांचा पाणउतारा कधी करीत नसत. उलट त्यांचा सर्वतोपरी मान राखत. मला वाटे, जगाला दाखवायला पमाताईंचा अट्टाहास आहे. कधीतरी वाटे हा अट्टाहास पमाताईंनी सोडावा.




पमाताईंचा नवरा 'शिवराख' ! पण पमाताई पडल्या पट्टीच्या मासळी खाणाऱ्या. पण नवरा 'शिवराख' म्हणून पमाताईंनी घरी कधी मासळी आणली नाही.

दर रविवारी सारी चाळ मासळीच्या हिंवस वासाने दुथडी भरायची. पण पमाताईंच्याकडे मात्र डाळीचं 'तॉय' नि आल्या-कोथिंबिरीची चटणी! शिकस्त म्हणजे बटाटयाच्या कचऱ्या किंवा मायाळूची भजी!

कुणी कधी पमाताईसाठी बांगडयाचं हुमण, पापलेटाची आमटी किंवा तळलेलं रांवसाचं काप पाठवायची सोय नव्हती! "आमगेल्या हुंबराभितर'असलें काय चलना गो बाये!" असं त्या म्हणायच्या.

कुणी मग त्यांना जेवायला बोलवावं नि मग तिथं पमाताईनं घरी न चालणारं 'असलें' चवीन खावं !

नवं बिऱ्हाड केल्यावर चार लोकांनी बोलावलं. नेहमीच अगत्यानं कोण बोलावणार? शिवाय नवऱ्याच्या नोकरी-बेकारी, बेकारी नोकरीच्या खेळाने घरात ओढगस्ती दाटूं लागली नि बरोबरच शेजाऱ्या-पाजाऱ्यांत दुरावा वाढूं लागला. खुद्द जवळच्या नात्याच्या माणसांतहि. पमाताईदेखील आपला आब राखून राहूं लागल्या ! त्या कुणाकडे तशा बसाय-बिसायला फारशा जाईनाशा झाल्या. अगदी आग्रहाचं आमंत्रण असलं नि काही काम आहे असं वाटलं तरच पमाताई जायच्या. दुसऱ्यासाठी काही करावं; इतरांसाठी झिजावं, त्याच्या मोबदल्याची अपेक्षा धरू नये ही रक्तातली वृत्ति !

पमाताईंसाठी तशी कामंहि येतं. विशेषतः व्याह्यांकडे 'खाचकं' पाठवायचं असलं की, पामाताईंची सर्वांना आठवण व्हायची. कारण पमाताई अति सुगरण. कारवारी पद्धतीचे कडक बुंदीचे लाडू त्यांच्या इतके चांगले कुणाला जमायचे नाहीत. इतर बायका म्हणत "पमाताईल्या हाताकच गुण आसा"!

ते खरंहि होतं. त्या अशा टपोऱ्या नि एकजात सारख्या गोल बुंदी पाडीत की त्या बुंदीच्या ढीगाकडे पहातच रहावं. त्यात एकहि वेडीवांकडी बुंदी शोधूनहि सांपडायची नाही. पमाताईंनी "पाक जालॉं गो" असं म्हटल की, त्याची 'तार' काढून पहावयाची आवश्यकता उरत नसे. चिरोटे तर त्यानीच भरावेत. त्यानी केलेले चिरोटे म्हणजे पातळ पातळ पाकळयांची शुभ्र कमळं. नि सगळे सारखे. पमाताईंचं पाककौशल्य खरच विरळा.

या पाककौशल्याचे प्रयोग व्हायचे इतरांकडेच. घरांत पमाताईंना कोंडयाचा मांडा करण्याकरितांच आपलं सारं पाककौशल्य पणाला लावावं लागे.

लग्नानंतर कांही वर्षांनी चाळकरी म्हणू लागले, "पमाताई लॉं, संसार म्हळयार नोकरी-बेकारी, बेकारी-नोकरी असॉ खोखोचॉं खेळ!"

या खेळाने तिच्या संसारात अस्थिरता स्थिरपद झाली. नोकरी नसताना ती कधी मिळेल याची चिन्ता अन् मिळाल्यावर कधी जाईल याची धास्ती.

अनुक्रमणिका






परंतु या कशानेहि पमाताईमधील स्नेहाळपणा करपला नाही. साऱ्या चिंता नि विवंचना त्यांनी पोटांत रिचवल्या नि ओठावर शालीन स्मितच मिरवलं.

दुसऱ्या महायुद्धाचा काळ आला नि गेला. "पमाताई आमगेलॉ ब्लॉक पळौच्याक येवच्याकच्च जाय हां तुवें–मुद्दाम ! असं म्हणून बऱ्याच चाळकऱ्यांनीं त्यांचा निरोप घेतला. पमाताईंना मात्र कधी चांगले दिवस दिसले नाहीत. उलट रेशनिंग वगैरेमुळे त्यांच्या मागे अधिकच शुक्लकाष्ठ लागलं.

याच काळांत त्यांचा थोरला दहा एक वर्षांचा मुलगा आजारी पडला. दोनचार दिवसानी ताप वाढला तरी पमाताईंनी काढ्या-वर ढकलला तरी ताप हटेना. पमाताईंचे यजमान नोकरी नसल्या-मुळें घरीच होते. शेवटी त्यानी गाववाल्या डॉक्टरला बोलावलं. डॉक्टरनीहि रोग्याच्या आईबापांना परवडतील अशी औषधं दिली. पमाताई शांतादुर्गेपुढे डोळे मिटून बसल्या. "जगदंबे !! तुगेल्या ओटींत घाला चल्याक. तूच ताका सांभाळ !" अगतिक होऊन म्हणाल्या.

तेवढ्यांत मुलानं हाक मारली. मुलाजवळ पमाताईंचे यजमान बसले होते. ते म्हणाले. "आयकलेंऽऽ ! व्हॉं आपयता–"

पमाताई, "कितँ रें पुताऽऽऽ" करून लगबगीनं त्याच्याकडे गेल्या. पुतानं तिच्याकडे एकवार पाहिलं. ओठ किंचित् विलग केले अन् डोळे मिटले. ते कायमचेच.

शेजारीपाजारी जमले. नातलग आले. 'देवाइच्छेमुकार कोणालें कितँ चलता?' असं म्हणत त्यांनी अंत्यविधीची तयारी केली अन् त्यासाठी त्यांनीच कुणी कुणी खर्च केला.

पमाताईंना ही गोष्ट फार लागली. "हावें मनांतसुद्धा कोणाला वायटपणा येवजिलॉ ना. मजेर ही परिस्थिती देवीनं कित्या हाडली सांग गोऽऽऽ" असं म्हणून त्यांनी आकांत केला. त्यांचा धाकटा मुलगा त्यावेळी पांचेक वर्षांचा होता. त्याला घेऊन पमाताई दीडएक महिना गोव्याला जाऊन माहेरी राहिल्या.

त्यानंतर मात्र त्या कधी माहेरी गेल्या नाहीत.

त्यांचा धाकटा मुलगा मोठा होत होता. नि वाढत्या महागाईत पमाताईंचा संसार होरपळत होता. ग्रीष्मांतील झळांनी लहान रोपटी शुष्क होत जावीत तसा शुष्क होत होता.

लोक आपसात म्हणत "पमाताईंनीं पापड लोणची कन्त विकची. या दिवसांत ताका चार पैशें मेळतीत. कित्या तँ काय कन्तसनना आसा ?"

पण हा प्रश्न त्यांना करण्याचं धैर्य सहसा कुणाला होत नसे. त्या असं कांही कां करत नाहीत हें कोणाला समजलं नाही. कदा-चित् घरंदाजपणाच्या काल्पनिक चौकटीत त्या अडकल्या असाव्या. ती चौकट मोडण्याचा त्यांनी प्रयत्नहि केला नाही. तेथेच राहून होरपळत राहिल्या ! मात्र त्याची धग कधीं त्यांच्या चेहऱ्यावर उमटली नाही. चेहऱ्यावर उमटली शालीन स्मिताची लाघवी रेषा !

तरी कुणा एका शेजारणीनं म्हणे पमाताईंना हा प्रश्न केलाच.








तूं कांही हातपाय कां हालवित नाही म्हणून विचारलंच. पाण्यांत मातीचं ढेकूळ विरघळावं तसं त्या हंसल्या. म्हणाल्या म्हणे, "ऊरूं गो. आतां हांवें आनी पैशें मिळोन कितें घर बांदचें आसा ?" त्या शेजारणीने अधिकच जोर केला पण पमाताई पुनः ढेकूळ विरघळल्यासारख्या हंसल्या ! न बोलतांना पुनः पुन्हा तशा हंसल्या!

पमाताईंचं स्वतः इतरांकडे म्हणजे भावावहिणीकडे नि दीरा-जावांकडे जाणं कमी झालं होतं. त्यांचंहि पमाताईकडे येणं पातळच झालं होतं.

लग्न मुंजी सारखं कार्य निघालं की, पमाताई मुहूर्ताच्या दिवशी आजारी पडूं लागल्या. त्यांचा मुलगा एकटाच त्यांच्या कुटुंबाचं अशा प्रसंगी प्रतिनिधित्व करी. विचारल्यास तो सांगे की आईला बरं वाटत नाहीं. अशा वेळीं पमाताईच्या बहिण-भावजया किंवा जावा नणंदा एकमेकींकडे अर्थपूर्ण पहात व भोळेपणानं बोलावं तसं म्हणत, "पमाताईक वारें ना खंय्. वचच्याक जाय एक दिवस!"

पण तो एक दिवस क्वचितच उगवे. गिरगावांत रहाणाऱ्या पमाताईच्या नातेवाईकांना उपनगरांत रहाणाऱ्या तोला-भोलाच्या नातेवाईकांकडे जायला वेळ सांपडे आणि उपनगरांत रहाणारी आप्तेष्ट मंडळी 'बटाटचाची चाळ' बघायला गिरगांव पार करून कोटात जाई. परंतु पमाताईच्या चाळीकडे वाट वाकडी करून येणं कुणाला जमत नसे.

जर कुणी पोंचलंच तर पमाताई निर्व्याजपणे म्हणत, "यां "यॉऽऽऽ तूं ! खूब्ब दिवस दिसलेंच ना म्हगो !"

पण एकाएकीं आश्चर्य घडावं तसं घडलं. त्यांचा अकरा-वीला पोंचेपर्यंत दोन वेळां गोते खाल्लेला मुलगा एस्. एस्. सी. ची परीक्षा पहिल्या प्रयत्नांत पास झाला.

त्यांचा मुलगा नापास झाला असता तर ती गोष्ट त्यांच्या दुर्दैवास अनुरूप झाली असती. परंतु त्यांचा मुलगा एस्. एस्. सी पास झाला.

पमाताईंनी चिमूट चिमूट साखर आल्या गेल्यांना वाटली. त्यांचे डोळे सारखे भरून येत होते. ते आनंदाचे होते का या प्रसंगी पेढ्यांऐवजी साखर द्यावी लागते या वेदनेचे होते कुणास ठाऊक !

कुणी पेढे मागितलेच तर पमाताई म्हणत, "दिवचेंच आसा. तागेल्या पैल्या पगारातल्यान सगळचांक पेढें वाटचें आसा."

आणि आश्चर्य म्हणजे तसा प्रसंगहि काही महिन्यानीच आला. पमाताईच्या मुलाला नोकरी मिळाली! नि विशेष म्हणजे पमा-ताईना वाटत असे तीच 'सेक्रेटरी–ऑफीसांतली' म्हणजे सेक्रे-टरीएटमध्ये नोकरी मिळाली! हा आश्चर्याचा मोठा धक्का होता.

मी मुद्दाम त्यांना भेटायला गेलो.

"शांता दुर्गेळी कृपा सगळी–तिणं कॅलें म्हणच जालें!" पमाताई म्हणाल्या. त्यानी खूप संयम पाळला होता. परंतु त्यांना झालेला आनंद त्यांच्या शब्दाशब्दातून अन् साध्या हाल-चालींतून बाहेर ओसंडत होता आषाढ घनांतून जीवंत सळसळ ओसंडावी तसा.

मात्र नोकरी नसलेले त्यांचे यजमान नेहमी प्रमाणेंच निर्वि-कारपणे रग घेऊन बसले होते. "सरकारी नोकरी कशीय् उरली तरी बरी रे! चार पैशें कमी मेळ्लॅ तरी एकपांटी मॅळ्तेर सुटचें भय ना!" त्या मला म्हणाल्या.

मी देखील म्हटलं की, खात्याच्या परीक्षा पास झाला तर तिचा मुलगा वर चढत जाईल. त्यांच्या यजमानानी एकवार माझ्या-कडे पाहून समाधानाचं स्मित केलं. पण तेवढंच. दुसऱ्या क्षणी गृहस्थ अजविलाप गुणगुणू लागला.

"विललाप स बाप्प गद्गदं—"

मला तीव्रतेनं वाटलं, पमाताईची गांठ या गृहस्थाशीं पडायला नको होती. वाटलं पमाताई त्यांचा मनातून तिरस्कारच करीत असतील. अन् तसं झालं तर त्यांत आश्चर्य नव्हतं. त्यांच्यामुळेच पमाताईंची स्थिती स्मशानातल्या नित्य चितेच्या झळा अंगावर घेत वाढ्या कर्दळीच्या रोपासारखी झाली होती.

पमाताई पुनः पुन्हा म्हणत होत्या "त्या सायबीणीनं कॅलें म्हण जालें सगळें!"

पमाताईची सायबीण नित्याचीच होती. अन् त्यामुळेच तिच्य। सायबिणीविषयी–शांतादुर्गविषयी माझ्या मनांत उगीचच अढी निर्माण झाली होती. समोर गेल्यास मला तिच्यापुढे हात जोड-ताना प्रयास पडले असते. परंतु यावेळी पमाताईनी तीन तीनदा केललं त्यांच्या सायबिणीचं कृतज्ञ स्मरण मला खटकलं नाही.

मुलाचा पहिला पगार झाला. दोन तीन दिवसांनी पमाताईनी सत्यनारायण पूजला.

आम्ही बऱ्याच उशीरा प्रसादाला गेलो. पमाताई नेहमीपेक्षा खूप सुरेख दिसल्या. सोन्याच्या ठसठशीत जुन्या दागिन्याला नवं पाणी द्यावं तसं वाटलं त्याना पाहून. मला उगीचच वाटलं दैव पमाताईंशी उंदीर–मांजराचा खेळ तर खेळत नाही.

खोलीत वर्दळ नव्हती. पमाताईनं दिलेला पेढा खात गम-तीन विचारलं, "आता सूनमुख लवकर दिसावं म्हणून मागणं केल की नाही सत्यनारायणाकडे?"

मानेनेंच नकार दर्शवीत त्या म्हणाल्या. "ना बाबा! आतां कसलीच इच्छा ना. हांवें शर्यत जिंकली. आतां बेगीच तागेल्या मांडेर मानें दवरन् दोळें धापचें. इतलें त्या सायबिणीनं कॅल्यार पुरॉ!"

त्यांच्याबरोबर मी देखील शांतादुर्गेच्या फोटोकडे पाहिलं–तिच्या पुढे आज तूपवात होती.–अन् चरकलोंच. माझं मन माझ्या नकळत म्हणालं होतं, "जगदंबे, तूं खरी असशील तर पमाताईचं हें ऐवढं तरी तूं ऐक !"

मी अपराध्यासारखा गप बसलों. आमच्याशिवाय कुणी नव्हतं. पमाताई कधीं नव्हत त्या यजमानांविषयीं बोलल्या. त्यांच्या पतीच्या गुणांचं चीजच झालं नव्हतं. आपल्या दुर्दैवामुळे. त्यांच्या वाटचाला कांही चांगलं आलं नाही. "आतां एकच इच्छा आस रॅ–फुडल्या जल्माक हॅंच पाय मॅळचें. मनासारखी तांगेली सॅवा करच्या मेळची. आनी जल्मभर तांका आनंदान पळवचें" पमा-ताई दाटल्या गळचानं म्हणाल्या.

मी त्यांच्या यजमानाकडे पाहिलं. माझी नजर गेल्याबरोबर पलीकडे पाहणारी आपली दृष्टि अजविलापाकडे वळवली !

पमाताई पोचवायला पहिल्या मजल्यापर्यंत आल्या. माझ्या पत्नीला म्हणाल्या, "अगो, एक दिवस बरें नुस्त्याचें कन्न आपय गो. कितलें दिवस जालें मासळी खावन्. ह्या दिवसांत पापलेट सुंटा बरी येतात न्ही?"

माझ्या पत्नीन त्यांना जरूर बोलावण्याच आश्वासन दिले. शर्यत जिंकल्याचा आनंद पमाताईंच्या चेहऱ्यावर सांध्यमेघावरील स्वर्णरंगासारखा पसरला होता.

मी दीर्घ श्वास घेऊन सोडला. नी जिना उतरू लागलो. "यॆतां गो पमाताई!" म्हणून निरोप घ्यायचं देखील मी विस-रलो. परंतु जिना उतरताना मला माझा मीच फार केविलवाणा वाटू लागलो होतो!

●●●

अनुक्रमणिका









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका




## नीलकण्ठ नांदुरकर

आयुष्यात 'थ्रिल्' नाही म्हणून साहेब जन्मभर कुरकुरत राहिले. ओरडतच राहिले, थ्रिल हवेच हवे ! अखेर ते आलेही. पण...........



**भिंतीवरच्या** त्या जागेवर गेलीं ३० वर्षें न [कुरकुरतां बसलेल्या घड्याळाने खाकरून ५ चे टोले दिले आणि [पुन्हां विरक्तासारखे काळाच्या जपमाळेतील क्षणाक्षणाचे मणी ओढूं लागले.

—मग साहेब उठले. एकवार नित्या-प्रमाणे जाकीटाच्या खिशात उबदारपणे विसावलेलं सोन्याचं पॉकेटवॉच काढलं. भिंतीवरच्या घड्याळाशी वेळ ताडून पाहिली. मग संथपणे पुन्हा घड्याळ खिशात ठेवलं. त्याची सोन्याची चेन सारखी केली. समोरच्या छोट्या स्टुलावरची गाथा मिटली. व्यवस्थितपणे कॉटजवळच्या टेबलावर ठेवली. कॉटखालच्या सपाता पायांत घातल्या. शाल पाठीवरून नीट पांघरून उजव्या खांद्यावरून तिचे एक टोक डाव्या खांद्यावर टाकलं. सफाईदार-पणे हात फिरवून तिच्या चुण्या नाहीशा केल्या. आणि हलकेच पण रुबाबदार चालीनं ते बाहेर आले. खोलीबाहेर कोपऱ्यांतली चांदीच्या मुठीची काठी घेतली तोंच पलीकडच्या दारावरल्या पड-द्याची सळसळ झाली. . . .अदबीनं सुनबाई पुढे आली. आणि साहेबांच्या काठीच्या टोकाकडे पहात हलकेच म्हणाली, "फार वेळ बसू नये बागेंत आज!" मग साहे-बानी नेहमीच्या लकबीनं उजव्या हाताच्या चिमटींत उजव्या डोळ्याजव-ळचा चष्म्याचा कोपरा धरला. आणि रोखून सुनबाईकडे पाहिलं. अशा रितीनं पाहिलं की, समोरचा माणूस दबतो असा त्यांचा अनुभव होता. ९ वारी इरकली

अनुक्रमणिका

पातळ चापून चोपून नेसलेली गुलाबी गोरी उमा पानांतून डोकावणाऱ्या गुलाबकळी सारखी दिसत होती. घरांत ९ वारी नेसलेलं आपल्याला आवडतं. हे जाणून सुनबाई ह्या घरांत आल्यापासून हें कटाक्षाने नेसते ह्या जाणिवेने त्यांचं मन समाधानानं भरून आलं—ते कांही बोलणार तोच सुनबाई घाईघाईनं म्हणली "आज किनई वारा सुटलाय फार पाचोळा उड-उडतोय!"

"बरं! जास्त उडायला लागला की येईन आंत!" इतकंच बोलून आणि सौम्यपणे हंसून प्रत्येक पावलागणिक आपल्या व्यक्तिमत्वाचा ठसा उमटवीत ते बाहेर आले. हॉलमध्ये त्यांचा प्रोफेसर मुलगा बुटाचे बंद बांधीत होता. ग्रे रंगाचा सूट त्याच्या गोऱ्यापान सुदृढ फिगरला शोभून दिसत होता. साहेबाना पहातांच तो उभा राहिला.

"बागेंत बसायला निघालात ना साहेब?" त्याने अत्यंत गोड आवाजांत विचारलं—साहेबांचे पाय थांबले. त्यांनी पुन्हा चष्मा सावरीत रोखून पाहिलं. डोळ्यांनी विचारलं, "ह्या वेळी मी नियमितपणे बागेंत जात नाही कां?" नजरेचा हा रोकडा सवाल. प्रोफेसरने जाणला. आणि तो म्हणाला "नाही, जरा वारा गार सुटलाय!"

हे ऐकल्यावर साहेबांना वाटलं खूप हसावं आणि म्हणावं "अरे किती काळजी घ्याल माझी?" पण आजवर ते इतक सलगीनं कोणाशीच बोलले नव्हते. काठीचं टोक टाईलवरच्या नक्षींतील फुलाच्या मध्यावर ठेवून साहेब निर्णायक आवाजांत म्हणाले, "वाऱ्याचा त्रास जास्त वाटू लागला तर मी खोलींत येईन!" आणि पुन्हा ते चालू लागले. मुलगा निमुटपणे बुटाचे बंद बांधू लागला. दाराशीं जातांना साहेब थांबले.—मेनरोडकडे जाणार आहांत कां? त्यांनी विचारलं.

"हो."

"मग तुम्हाला वेळ असेल तर ज्ञानोदय ग्रंथ भांडारांतून दांडेकरांची ज्ञानेश्वरी आणा." आणि किंचित् थांबून काठी वर उचलून तोंडासमोर तलवारीसारखी धरून ते पुढे म्हणाले "आय् हॅव ऑलरेडी पेड २५ रुपिज इन ॲडव्हॉन्स!"

—"आणतो ना!" मुलाने असे सांगितल्यावर साहेब बाहेर पडले. साहेबांची चालच अशी की, तिला त्यांच्या प्रभावी व्यक्तिमत्वाचं वजन होतं. साहेब खोलीतून बाहेर गेल्यावरही उदबत्तीचा वास दरवळावा तसा त्यांच्या व्यक्तिमत्वाचा प्रभाव दरवळत असे.

नित्याप्रमाणे नोकराने त्यांची आरामखुर्ची बागेंतील उजव्या दरवाजाजवळ जाईच्या वेलीपाशीं टाकली होती. जवळ स्टुलावर सारी इंग्रजी, मराठी वृत्तपत्रें होती. साहेबांनी काठी खुर्चीच्या मागे अडकविली. आणि त्याचवेळीं आरामखुर्चीचा दांडा ठाकठीक आहे की, नाहीं तें पाहिलं. प्रत्येक बारीक सारीक गोष्टींत सावधगिरीनं वागणं हें साहेबांचं खास वैशिष्टयं होतं.

मग साहेब हळुवारपणे त्या खुर्चीत बसले. हात लांब करून त्यांनी स्टुलावरचं वर्तमानपत्र उचललं. वर्तमानपत्रं वाचण्याची साहेबांची एक पद्धत होती. प्रथम जाड टाइपातले मथळे नंतर अग्रलेख, अग्रलेखाने मनावरचा ताण कमी करण्यासाठी करंट टॉपिक्स, चुटके, मग जाड टाईपाच्या मथळ्याची शिरस्त्राणं घालणाऱ्या बातम्या नंतर जाहिराती. त्यांनी मराठी वर्तमानपत्र उघडलं. "रशियन आकाशवीराचं यशस्वी पृथ्वीभ्रमण.—" हा सात कॉलमी मथळा पाहून साहेब थबकले आणि मग नियम सोडून त्यांनी ती बातमी पूर्ण वाचली एकदां नव्हे तीनदां तीच बातमी वाचली. लगेच उजव्या बाजूच्या चौकटीतील दुसऱ्या मथळ्यानं साहेबांचे लक्ष वेधलं. "पुरुषस्य भाग्यम्" हा देववाणीतील मथळा दिलेल्या बातमीनं साहेबाना सांगितलं की, लंडनमधल्या कुठल्या एका परगण्यांत एका श्रीमंत विधवा बाईने आपली २ लाख पौंडाची सारी इस्टेट एका प्राथमिक शाळेच्या मास्तराला दिली. कां तर म्हणे तो मास्तर शाळेत जातांना आणि येतांना रोज तिच्याशी अर्धा तास गप्पा मारीत असे व तिचे मनोरंजन करीत असे. तिला वर्तमानपत्र पुस्तकं वाचून दाखवी.

ह्या दोन बातम्या साहेबांनी पुन्हा पुन्हा वाचल्या. इंग्रजी वृत्तपत्रातही त्याच बातम्यांना प्राधान्य होत. आणि वर्तमानपत्र तसच मांडीवर ठेवून साहेब पहात बसले. नेहमी निर्विकारपणे बातम्या वाचणारे साहेब आज कां कुणास ठाऊक पण भारल्यासारखे झाले होते. अर्थात हे त्यांच्या नेहमीच्या वागण्याच्या विरुद्ध होतं. ह्या बातम्यानी नक्की आपल्याला अस्वस्थ कां वाटतं हे ते शोधीत होते.

आणि अचानक साहेबांना वाटलं की, असं आपल्या आयुष्यांत काही कधी घडलंच नाही—हे थ्रिल आहे. असं सुंदर थ्रिल आपल्या ७२ वर्षाच्या आयुष्यांत कधी डोकावलं नाही.

'थ्रिल नाही तर काय? एक मर्त्य मानव पुराणांत वर्णन केलेल्या अहिल्येच्या कथेतील इंद्रासारखा चक्क पृथ्वीला प्रदक्षिणा घालून येतो. काय अद्भूत अनुभव हा! बातमीमधले युरी गागारीनचे शब्द त्यांना आठवले. पृथ्वी प्रदक्षिणा केलेला तो वीर लोकांना सांगत होता. "युनिक कॉमरेड्स!" दि अर्थ वॉज लाइक ए ब्ल्युईश बॉल वुईथ ए ऑरेंज लाईट अराउंड ईट!" नारिंगी उजेडांत ती निळ्या चेंडूसारखी दिसणारी पृथ्वी किती सुंदर दिसत असेल. साहेबांच्या अंगावर काटा आला. छे:—थ्रिलींग—त्यांनी डोळे मिटले. आणि ते पृथ्वीचा निळा चेंडू डोळ्या समोर आणण्याचा प्रयत्न करू लागले. पण तो निष्फळ ठरला. त्यांच्या नजरेपुढे पृथ्वीचा गोल आला. पण तो युरी गागारीनने पाहिलेला नाही. तर त्यांनीच हायस्कूलमध्ये भुगोलाच्या ब्रह्मे सरांनी हातांत आणलेला पृथ्वीचा गोल—तो गरगर फिरू लागला.

साहेबांनी चिडून डोळे उघडले. आणि हा लंडनचा प्राथमिक शाळा मास्तर! क्षणांत २ लाख पौंडाचा मालक झाला. २ लाख गुणिले तेरा, २६ लाख भारतीय






रुपये. छे: भिकाऱ्याचा लक्षाधीश झाला. थ्रिलच नव्हे का हे–लंडनचा मास्तर झाला म्हणून काय झालं त्याला पगार कितीसा असणार? आणि ही बातमी कळल्यावर त्याला आनंदाने वेडं केलं असेल. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले असतील. काही क्षण साहेब सुन्न होऊन बसले. त्यांनी डोळे मिटले–छे: मन विषण्ण झालं असं आपल्या आयुष्यांत काही घडलं नाही! काही नाही!!

कापड दुकानांतील विक्रेत्याने कापडाचे तागे उलगडून पुढे टाकावेत तसे गत आयुष्यांतील प्रसंग त्यांच्या नजरेपुढे उलगडूं लागले. पण हे कापड एकाच फिकट रंगाचे होते. त्यावर नक्षी नव्हती. रेषा नव्हत्या. डाग नव्हते. चुकून फाटका तागा लागला नव्हता. काही नाही. आपल्या आयुष्यांत सारं सुरळीत झालं. व्यवस्थित झालं कुठेच थ्रिल नाही.

जन्म श्रीमंत वकीलाच्या पोटी. हायस्कुलांत गेल्यावर इंग्रजीचा स्पर्श झाला आणि ते रुबाबांत सांगू लागले "आय वॉज बॉर्न वुईथ ए सिल्व्हर स्पून इन माय माऊथ? एकुलता एक मुलगा म्हणून किती लाड! छे. मागतिलं ते मिळत होतं. दु:खाचा स्पर्श नव्हता.

गरीबाघरीं जन्म झाला असता तर हाल. शिळंपाकं अन्न, फाटके तुटके कपडे. ते सुद्धां थ्रिलच की. बरं परमेश्वराने तीव्र बुद्धी पण देवून ठेवली. त्यामुळे नापास होण्याचा प्रसंग नाही म्हणजे नो थ्रिल!

योग्य वेळीं साहेब एम्. एस्. सी. झाले. आणि त्यांना सिक्युरिटी प्रेसमध्ये सुपरवायझरची जागा मिळाली. ४० वर्षापूर्वीची गोष्ट त्यावेळी ४०० रु. पगार म्हणजे आताचा १॥ हजार झाला. वडिलांची इच्छा होती की, मुलाने लॉकडे जावे. बॅरिस्टर व्हावं. आपला व्यवसाय पुढे चालवावा पण साहेब सायन्सकडे गेले तर एका अक्षरानी बोलले नाहीत. त्यावेळी बोलले असते, विरोध केला असता, तर भांडलो तरी असतो. घरांतून बाहेर पडलो असतो. एका कपडयानिशी–मग उपाशी तापाशी रहाण्याचा प्रसंग आला असता. थ्रिल आलं असत. पण नाहीच.

—प्रेसमध्ये नोकरी लागली आणि अनुराधेशी लग्न झालं. त्याकाळी प्रेमविवाहांना आरंभ झाला होता. प्रेम करण्यात–ओढ लागण्यात, झुरण्यात थ्रिल असतं असं एका इंग्रजी कादंबरीत साहेबांनी वाचलं होतं. पण त्यांच्या आयुष्यांत तो योग नव्हता. रीतीप्रमाणे मुलगी सांगून आली. पसंत केली. ३ हजार रुपये हुंडा (त्या काळांत) आणि सालंकृत कन्यादान शिवाय ४ दिवसाचा लग्नाचा दोन्हीकडचा खर्च इतकं यादीत लिहून साहेबांच्या सासऱ्याने लग्नाचा धडका उठवला.

जगाप्रमाणे साहेबांचा संसार सुरू झाला. पण त्यांतहि काही थ्रिल नाही. भांडण नाही. रुसवा नाही. फुगवा नाही. शांत गरीब स्वभावाची अनुराधा, कधीच तिनं कोणत्याच गोष्टीला विरोध केला नाही. साहेबांच्या नजरेपुढे अनुराधेची प्रतिमा तरळूं लागली. दिवाणखान्यातलं तिचं सोनेरी चौकटीतलं चित्र डोळ्यापुढे आलं. तिच्या निधनानंतर पहिल्या श्राद्धदिनीं त्यांच्या मुलानं आईचं ते तैलचित्र दिवाणखान्यांत लावलं होतं. मुंबईच्या एका नामवंत चित्रकाराकडून २ हजार रुपये देऊन तें तयार करून घेतलं होतं.

वाटोळया प्रसन्न चेहऱ्याची अनु, तिचे मोठाले टपोरे डोळे. ह्याच डोळ्यावर खूष होऊन साहेबांनी तिला पसंत केली होती. शेलाटी आकृति, गोरा रंग, खळी पडणारे गाल. आणि अनुचे केस! हजारांत एकादीचे असे केस. वेणी घालायला मोकळे सोडले की, पोटरीच्या खाली जायचे. अनुशी लग्न झालं आणि दोन वर्षात लंडनला जायचा योग आला. ३ महिन्याच्या ट्रेनिंगसाठी–येतांना प्रेसची मशीनरी आणायची होती. त्या प्रवासांतहि थ्रिल नव्हतं. सरळ बोट गेली आणि आली.

पुढे दोन वर्ष अनुभव घेऊन एकदम कंट्रोलरची जागा मिळाली. गॅझटेड ऑफिसरची पोस्ट १,२०० रु. पगार. रहायला दुमजली भव्य सरकारी बंगला. प्रशस्त बाग, पोर्च, गॅरेज आणि ह्या जागेवर रिटायर्ड होईपर्यंत राहिलो. मान, पैसा सारं सारं होतं. नव्हतं फक्त थ्रिल.

उमेशच्या वेळीं अनूला दिवस गेले. तिची काया मोहरली. "मी आई होणार आहे" हे गोड गुपित सांगतांना तिच्या अंगावर रोमांच आले होते. ९ महिने गर्भ पाळणे आणि मग जन्म देणं ह्यांत केवढ थ्रिल आहे ते फक्त अनूला अनुभवायला मिळालं–बाळंतपणही सुरळीत झालं. निसर्ग नियमाला धरून. मूल अडलं नाही. ऑपरेशनची वेळ आली नाही. आई हवी कां बाळ हवं असा थ्रिलींग प्रश्न विचारला गेला नाही. नो थ्रिल ॲट ऑल!

उमेश हे नांवही साहेबांनी सुचवलं. अनूनं आनंदाने संमती दिली. उमेशच्या जन्मानंतर त्यांनी अनूला सांगितलं "हेच आपलं पहिलं आणि अखेरचं मूल!" तिनं फक्त प्रश्नार्थक मुद्रेन साहेबांकडे पाहिलं होतं. आणि साहेबांनी खुलासा केला.

आपल्या घराण्यांत पिढ्यान् पिढ्या एकच मुलगा झालेला आहे. अनुवंशिक गुण म्हण. खापरपणजोबाना पणजोबा एकटेच पणजोबाना आजोबा एकटेच. आजोबांना माझे वडील एकटेच. मी एकुलता एक. आपल्याला हा उमेश एकच पोरगा. त्यालाही एकच मुलगा होईल. मुलीची भानगड नाही.

त्यावर अनु सहज हंसली. साहेबांना वाटल अनू नाराज का झाली नाही? पण नाराज होणं हा तिचा स्वभावधर्मच नव्हता मुळी, उमेशच्या जन्माआधी साहेबाच्या कुशीत शिरून तिनं सांगितलं, मला वेगळ अस्तित्वच नाही. माझ सुख तुमच्या सुखांत मिळून गेलय्. "मुलगी झाली असती तर बरं झाल असत जिवाभावाने वाढवायची अन् दुसऱ्याच्या स्वाधीन करायची. सासरी जातांना मुलगी बापाला नमस्कार करते तो प्रसंग किती थिलींग असणार. साहेबाना काही दिवसापूर्वी वाचलेल्या शाकुंतलमधील कण्वाचे बोल आठवले. कण्वाला निदान मानलेली मुलगी तरी होती आम्हांला तीही नाही.

बरं उमेशही साहेबांचाच मुलगा, त्यांच्या बुद्धिमत्तेचा वारसा घेऊन जन्मलेला. त्याने आपल्यासारख सायन्सकडे जावं अस वाटत आपल्याला. किंबहुना आपल्याप्रमाणे आपल्या मुलाने व्हावे असे प्रत्येक बापाला वाटते की, काय कोण जाणे. पण उमेशला जात्याच साहित्याची आवड. मॅट्रिक पासूनच त्याच्या गोष्टी, कविता मासिकांतून छापून येऊ लागल्या. त्याने आर्टसकडे जायचं म्हटल्यावर आपण विरोध केलाच नाही. त्यावेळपर्यंत साहेबांच्या स्वभावात फार बदल झाला होता.

इंग्रज अधिकाऱ्यांच्या संगतीत काम केल्याने त्यांच्या वागणुकीत फार फरक झाला होता. ते अबोल, गंभीर झाले होते. आपले काम चोख. इतर ठिकाणी लक्ष घालू नये ही वृत्ति निर्माण झाली होती. नकळत साहेबांची कठोर शिस्त त्यांच्या अंगी बाणली होती. पण संस्कृतीचे संस्कार मात्र होते. ऑफिसांत कडक सुटबुटांत वावरणारे साहेब घरी आले की, पायघोळ धोतर, मलमलीचा सदरा वापरीत होते. सकाळ संध्याकाळ संध्या, पूजा नियमाने करीत होते.

उमेशच्या लग्नाच्या वेळी तीच गत. साहेबांना वाटल त्यावेळी उमेशन प्रेम विवाह का केला नाही? त्याच्या कवितांवर, गोष्टींवर, सौंदर्यावर, वक्तृत्वावर खष झालेल्या पोरींचा तांडा बंगल्यावर येत असे. पण उमेश प्रेमाच्या भानगडीत पडलाच नाही. साहेबांच्या हाताखाली ऑफिस सुपरिटेन्डटचे काम करणारे शामराव देशपांडे यांची मुलगी शरयु साहेबांनी पाहिली. देशपांडेचांकडे कसलासा धार्मिक समारंभ होता. त्यांनी अगत्याने साहेबांना बोलावले. तिथे वाढायला आलेली शरयु साहेबांच्या नजरेत भरली. केतकीसारखा रंग, देशस्थांत असा रंग दुर्मिळच, उफाडी देहयष्टी, निमुळता चेहरा, सरळ धारदार नाक. त्याच दिवशी साहेबांनी देशपांड्यांकडे मागणी घातली शरुला. उमेशला शरयु आवडली. अर्थात कोणालाहि आवडावी अशीच होती ती. देशपांड्याचा आधी विश्वासच बसला नाही. त्यांना वाटलं बोकिल साहेब थट्टा करताहेत. पण मग ते आनंदाने वेडे झाले. धडाक्यांत लग्न झालं. त्यावेळी उमेशनं विरोध केला नाही. विरोध केला असता भांडणझालं असत तर ते थ्रिल पण नाहीच . . . . .

उमेशच्या लग्नांत अनूची आठवण झाली. ती मरतांना म्हणाली होती . . . साहेबांना अनूचा मृत्यु आठवला. १० वर्षे झाली. टायफाईड. अन् त्यांत मॅनेजायटिस. मरतांना शुद्धीवर होती. साहेबांचा हात हाती घेऊन म्हणाली. "मरणांचं भय वाटत नाही. उलट सुवासिनी म्हणून मरण येतंय, पण खरं सांगू का, मला मुलीची फार आवड होती. म्हटलं उम्याच्या बायकोला मुलगी मानून तिचं कौतुक करावं. पण ते आतां अशक्य आहे. माझी एक इच्छा पुरवा गडे-उम्याला सुंदर बायको पहा आणि मुलीसारखी माया लावा तिला."

अनुची ही इच्छा आपल्याकडून पुरवली जाते का? मनात असूनहि आपल्या अबोल शिस्तप्रिय वागणुकीन ते जमत नाही . . आपल्या मर्जीविरुद्ध उमा आणि उमेश दोघेहि वागत नाहीत. घरांत ९ वारी बर दिसत अस साहेब सहज म्हणाले होते. ते उमान ऐकल आणि तेव्हापासून कटाक्षाने घरांत ९ वारी नेसते. साहेबाच्या जेवणाच्या, चहाच्या वेळांत चुका होऊ देत नाही. सारं काम मनापासून करते. राग नाही. धुसफुस नाही. चेहरा सदा प्रसन्न, टवटवीत. तिच्यावर रागावण्याचा प्रसंग नाही. म्हणजे नो थ्रिल आणि त्या गोड पोरीवर रागावणेहि जमणार नाही.

छे! आमचे आयुष्यच असे बेचव. गुळगुळीत.

साहेबांनी डोळे मिटले. आज आप-



आम्हां घरी धन्य कवि हेच 'रत्न'।
काव्य-विडंबन यत्नें करूं ।।

शब्दाचे अमुच्या हातांत हत्यार।
तासू थोडेफार कवि-लोकां ।।

शब्दाचीच कडी शब्दाचाच भात।
फोडणीहि त्यांत शब्दांचीच ।।

* * *

दिन् दिन् दिवाळी
साहेबाला ओवाळी
साहेब कोणाचा?
वशिल्याचा
वशिला कोणाचा?
मंत्र्याचा
ए साहेबा लांचेमधला वाटा
एकटा एकटा किती खातोस नोटा!

* * *

किस् बाबा किस्
लवकर किस्
वोडके साहेब
काढील किस्
वोडक्याचा शिपाय कावळा-डोम
मारील बोंब बाई मारील बोंब

* * *

रुण झुण पांखरा —टा ऽ टा
जा माझ्या माहेरा—टा ऽ टा
माझ्या माहेराची—टा ऽ टा
लालबागला खोली—टा ऽ टा
'ट्रॅम'मध्ये बैस जा—टा ऽ टा
सांग माझ्या आईला—टा ऽ टा
सांग माझ्या बहिणीला—टा ऽ टा
मॅटेनीच्या 'शो' ला—टा ऽ टा
या तुम्ही 'प्लाझा'ला—टा ऽ टा

—ह. शि. खरात










त्याला अस का वाटतय हे त्यांना उमगेना वृत्तपत्रातील दोन वातम्या वाचून आपले विचार इतके, भरकटले. नाही नाही ते विचार मनांत येत आहेत केवळ थ्रिल-साठीं. हा थ्रिलचा आनंद मिळणार नाही. आता आपले आयुष्य किती उरले आहे ?

—फाटकावरची खीळ वाजली म्हणून साहेबांनी दचकून डोळे उघडले. एक साठी उलटलेली स्थूल वृद्धा फाटक उघडून आंत येत होती. साहेबांना वाटलं असेल कोणी सैंपाकीण. उमाने वोलावली असेल. पण दुसऱ्या क्षणी त्याना विस्मयाचा धक्का बसला. ती म्हातारी त्यांच्याकडे रोखून पहात उभी राहिली. त्यांच्याकडे आली. आणि सरळ साहेबांच्या समोर स्टुलावरचे पेपर बाजूला न करतां धप-कन् त्या स्टुलावरच बसली. दोन्ही हात जोडल्यागत करून ती हंसत म्हणाली. "ओळखलस मला श्री?" साहेब दचकले. त्यांना त्या म्हातारीचा राग आला होता. आपली शिस्त आणि प्रतिष्ठा यांना तुड-वीत ती बाई आली. रीतीरिवाज झुगा-रून अडाण्यासारखी स्टुलावर बसली. आणि चक्क विचारते "मला ओळखलस का श्री?" श्री या नांवानं त्यांना कोणीच पुकारत नव्हतं. वडील श्रीनिवास म्हणत. पुढे प्रेसची नोकरी लागल्यापासून साहेब हेच नांव रूढ झालं होत.

ही बाई— काय म्हणावं हिला. माझ्या-कडे भेटायला आली पण आगाऊ वेळ टरवून आली नाही—मॅनरलेस्. ताडताड बोलून या अडाणी म्हातारीला घालवून द्यावं असा एक विचार साहेबांच्या मनात डोकावून गेला. पण का कुणास ठाऊक ते जमलेच नाही. ते शून्य नजरेनं बाईकडे पहात राहिले. त्यांना वाटलं कदाचित ही बाई भ्रमिष्ट तर नसेल ? तोच ती बाई म्हणाली "एक केस पांढरे झालेत एवढं सोडल तर तुझ्यांत काही बदल झाला नाही श्री !" आणि पुन्हा हात चोळीत ती मंद हसली तरी साहेब वोलले नाहीत. "मला ओळखल नाहीस ना?" त्या बाईनं पुन्हा विचारलं.

छे:! या वाईला सुनावलंच पाहिजे. अल्लडपणाने स्टुलावर बसते काय ? हात चोळीत हसत पोरकटासारखी वोलते काय? पण काही न सुनावताच साहेबांनी नुसती नकारार्थी मान हलवली. तशा त्या बाई मोठ्याने हसल्या. आणि लहान मुलीसारख्या म्हणाल्या "नाही ओळखलं? कमाल आहे रे वावा तुझी. मी तीन म्हणे-तोवर ओळख? हां. एक—दोन.

ह्या वाईला नक्की भ्रम झाला आहे याची साहेबांना खात्री पटू लागली. त्यांना वाटलं माळ्याला सांगून ह्या वेड्या बाईला वाहेर घालवाव. तोच त्या वाईनी म्हटल "तीन ! नाही ओळखलस? अरे मी सई. आकुत मास्तरांची. वकीलवाडीत तुमच्याच वाड्यांत रहात होतो आम्ही. आपण एकत्र खेळलेलो वाढलेलो. . . .

आणि एकदम साहेब शहारले. कबुत-रांचा कळप भुरकन उडाला तशी ६० वर्षे नजरेपुढून गेली आणि साहेबांना सारं आठवलं. वकीलवाडीतला तो भव्य वाडा जिन्यालगतच्या अंधाऱ्या खोल्या. त्यांत रहाणारे उंच आकुत मास्तर आणि त्यांची एकुलती एक मुलगी सई—अल्लड, बडवडी खेळकर—ती सई आली आहे. त्यांनी निरखून पाहिल. तीच ही ! शंकाच नाही. तोच हा निमगोरा वर्ण, तरतरीत नाक मोठाले डोळे. हंसरी जिवणी. ह्या वयातही पांढरे झालेले केस किती भरगच्च आहेत. सईच ही.

आणि मग साहेबांना आणखी आठवू लागले. सायंकाळी आपली वाट पहात वाड्याच्या पुढे चौथऱ्यावर वसणारी सई, चिंचा, पेरू, दाणे त्यांच्यासाठी जपून ठेवणारी मुलांच्या भांडणात त्यांच्या बाजूने भांडणारी बंडखोर सई, वेळ जात नसला की सागरगोटे झेलीत येणारी व उखाणे, कोडी सांगणारी वडवडी सई. सईचा एक वेळ खेळ आठवला. आचानक येऊन डोळे झाकीत सई म्हणे "हां. भरा-भर म्हण "गोरा राम काळा राम" आणि आपण भराभर म्हणताना नेमक गोळा राम, कारा राम अस व्हायचं. एक ना दोन अनेक आठवणीनी साहेब आनंदले. त्यांचे सईच्या सहवासातील गोंडस बाल-पण त्यांच्या डोळ्यासमोर नाचू लागले. काय योगायोग आहे आपली वालमैत्रिण सई. आकुत मास्तराची सई आली आहे. .

आपलं, शिस्तप्रिय, रोखठोक आणि सदोदित मॅनर्सच्या छायेत वावरणारं मन हलक फुलक झालय अस साहेबांना वाटत. गेली ४० वर्षे आपल्या जीवना-भोवतीं उभी असलेली मॅनर्सचीं कुंपणं कोसळून पडलीं आहेत असा भास त्यांना झाला. जणुं ही सई त्यांचे डोळे झाकण्या-साठीच आली आहे, असं क्षणभर त्यांना वाटत. एका आगळ्या उल्हासान त्यांनी सईकडे पाहिलं. मात्र नेहमीप्रमाणे चष्म्याची कड उजव्या हाताच्या चिमटीत धरून नाहीं! त्यांनी लगेच म्हटलं "तूं आली आहेस सई!" सई मोकळेपणाने हंसली. ते ओळखीच हास्य पहाताच साहेबांच्या अंगावर रोमांच उभे राहिले..

"पटली ना ओळख? भाग्य आमचं!" सई मंदपणे हसत म्हणाली.

"न पटायला काय झालं. ? पण तूं इकडे कशी?" साहेबांनी मंदपणे हसत विचारलं साहेबांच्या त्या प्रश्नाने सई एकदम गप्प झाली. गंभीर झाली. आळ-वावरच पाणी घरंगळून जाव तस क्षणभर तिचं बाल्य जाऊन ती पुन्हा साठी उलट-लेली वृद्धा बनली. एक दीर्घ उसासा टाकून तिनं म्हटलं "कशी आलेऽऽ? दैवानच आणलं बाबा.'

साहेबांना काही अर्थबोध झाला नाही. भिवया उंचावून ते तिच्याकडे पाहू लागले. पुन्हा सई क्षणभर स्तब्ध झाली. सांगाव की, नाही असा भाव तिच्या चेहऱ्यावर तरळून गेला. आणि मग ती सांगू लागली. भडाभड तिन गेल्या ४० वर्षा-तील घटना साहेबांना सांगितल्या.

ती १२ वर्षाची असतांना मास्तरांची बदली झाल्यामुळे त्यांना सोडावं लागणार नाशिक, मास्तरांना झालेला अर्धांगवायू, त्यामुळे लाचार झालेल्या मास्तरांनी १५ वर्षाच्या सईचा वऱ्हाडातील ४०








वर्षाच्या श्रीमंत विजवर जमीनदाराशी लावलेला विवाह. पुढच्याच वर्षी मास्तर गेल्याने आलेले पोरकेपण:—आणि एका अपघातांत नवरा गेल्याने आलेले वैधव्य. कपाळ करंटी म्हणून सासरी निघालेले धिडवडे—विधवेचे भोगावे लागणारे भोग तापाच्या साथीत सासरची झालेली वाताहत आणि त्यानंतर गेली ३५ वर्षे हाती असलेल पोळपाट लाटणं. टिचभर पोट जाळण्यासाठी करावी लागणारी वणवण या व्यवसायातील अडीअडचणी—तारुण्यावर खिळलेल्या विषारी नजरा—त्यांतून सही सलामत ठेवलेली अब्रू—इतके असूनहि लाचार न होता काढलेली ३५ वर्षे हे सारं सई सांगत होती. आणि साहेब अत्यंत सावधानतेने ऐकत होते:—"सध्यां मी यवतमाळच्या जोशी मामलेदाराकडे सैंपाकाला असते. मामलेदारीणबाईचा माझ्यावर फार जीव आहे. त्यांच्या मुलाच आज सकाळी येथे लग्न लागल. इथलीच मलगी आहे. नको नको म्हणत असतां मामलेदारीण बाईच्या आग्रहावरून मला येथे यावे लागले. गावात आलो आणि सार बालपण माझ्या डोळ्यापुढे उभ राहील. श्री. वेड्यासारखी मी वाड्यावरून चक्कर मारून आले. तेथें तुमची चौकशी केली. मला सार सार कळलं तुझ्यावद्दल. या बंगल्याचा पत्ताही तेथेच मिळाला. तूं एवढा मोठा झालास. फार फार बर वाटलं. अगदीच रहावेना म्हणून मामलेदारणीला गुंगारा देऊन आले बघ इकडे. तुझा हा बंगला पाहूनच जीव सुखावला. भुकेल्या माणसाला सुग्रास अन्न मिळाल्याच्या आनंदात सई बोलत होती. आणि आपली बालमैत्रिण भेटल्याच्या सुखद आनंदात साहेब ऐकत होते. आणि अचानक सई गंभीर झाली. मग हळूच म्हणाली, "पण आतां मला वीट आलाय हिंडायचा. श्री. तुझ्याजवळ राहूं का?"

साहेवांनी दचकून तिच्याकडे पाहिल.

सई संथपणे बंगल्याकडे पहात स्वतःशी बोलावं तसं म्हणाली, "कधी कुणाला न सांगितलेल, गेली ५० वर्षे केवळ माझ्या मनाशी जपलेल एक गुपित सांगते "श्री आपण एकत्र खेळत असूं, मला वेडीला वाटे श्रीच नवरा होईल. आपला—तुझी श्रीमंती ऐश्वर्य याचा विचार मनांत येईच ना? मनोमन तुला माझा नवरा मानलं मी. सई पुन्हा थांबली. "पण वऱ्हाडच्या बिजवराशी लग्न करताना ध्यानीमनी तुझीच मूर्ती होती. आता पटतय की, ते अशक्य होत. मी पायरी सोडून वागत होते. आभाळीचा चंद्र मागत होते. मग मानेला झटका देऊन ती म्हणाली, ते जाऊं दे. पण मनापासून सांग आतां तरी राहू कां इथे? इथेच हाडं पडू दे माझी श्री. वाटल्यास सैंपाकीण म्हणून ठेव."

सईच्या प्रत्येक वाक्याबरोबर साहेवांच्या अंगावर शहारे येत होते. थ्रिल. येस्.—जे. गेल्या ५० वर्षात अनुभवल नाही ते थ्रिल! थ्रिल नाहीतर काय? जीवाभावाची बालमैत्रिण ५० वर्षानी भेटते. सुखद बालपण डोळ्यापुढे उभं करते. खरं. थ्रिल म्हणजे तिचं. आपल्यावर प्रेम असतं आणि त्या आधारावर येथे राहून म्हणते. साहेब गोंधळले. नेहमी निश्चित निर्णय घेणारे साहेब आता पार गडबडले. हव होत ते थ्रिल मिळाल पण आपली बालमैत्रिण इतकी वर्षे आपल्यावर मनोगत माया करणारी सई निराधार विधवा म्हणून आपल्या घरी येऊ पहाते. कस शक्य आहे? सैंपाकीण म्हणून ठेवली तर? पण हा विचारच असह्य आहे. बालमैत्रिण अन् सैंपाकिण? मग तशी राहिली तर कोणत्या नात्यानं? उमेश सुनबाई काय म्हणतील? नातलग, समाज ह्याना काय वाटेल? छे! छे! सुचत नाही.

थ्रिलचा अनुभव सुखद अस वाटल होत पण आतां पटतय् की, थ्रिल दाहकही असत. काय कराव? साहेबांच डोक भणाणल आणि मग डोक दोन्ही हातांत गच्च धरून ते सईकडे नुसते एकदम पहातच राहिले——

●●●

# लागेबांधे

—ना. व्यं. देशपांडे



**भल्या** मोठ्या हॉस्पिटलमधील एक लांबलचक ओवरी. एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत दृष्टिक्षेप टाकला तर दुसऱ्या टोकाकडील माणसे आंगठ्याएवढी लहान दिसण्याइतके अंतर! पहिल्या टोकाच्या बाजूला असलेल्या एका जनरल वॉर्डाच्या बाहेर शेवंतीचा स्ट्रेचर ताटकळत उभा होता. वॉर्ड नेहेमी भरलेला असायचा. सुदैवाने एक रोगी नुकताच आटोपला होता, ती जागा मोकळी करण्यात येत होती. शेवंती ती जागा भरून काढणार होती. सारे काम घड्याळाप्रमाणे चालले होते. ओवरीमध्ये स्ट्रेचरची ढकलगाडी ठेवून दोन घंटे झाले होते. हॉस्पिटलमध्ये दाखल होऊन चार घंटे. तिच्या नवऱ्यानेच आणून दाखल केली होती. डॉक्टरांना काहीसे सांगन तो निघून गेला होता. रोग्याचा कागद तयार होईपर्यंत तो स्वस्थ मनाने तेथून निसटला होता.

तिचे सारे अंग भाजून निघाले होते. भरीत करण्यासाठी काळेकुळीत तजेलदार वांगे भाजताना त्याची त्वचा कशी सुरकतत जाते आणि त्याच्या सालीचे पापुद्रे निघू लागतात त्याप्रमाणे तिचे अंग झाले होते. चेहेरा मात्र पुष्कळसा शाबूत होता. केस निम्मे जळाले होते. अंगभरून नुसती आग भरली होती. उपचाराच्या खोलीत डॉक्टरांनी निर्विकारमनाने कसलेसे औषध चोपडले होते आणि तिचे नग्न शरीर वर पोकळ जाळी ठेवून चादरीमध्ये लपेटून टाकले होते. तिच्या कागदावर रोग्याचा इतिहास लिहितेवेळी— 'स्टोव्हच्या भडक्याने भाजून अपघात' असे खरडून तिच्यावर केलेल्या उपचारांची नोंद अनाकलनीय अक्षरांमध्ये करून डॉक्टरांनी पुढच्या रोग्याला तपासायला सुरुवात केली होती. रोज असल्या हजार केसेस. वेळ कोणाला आहे एवढ्या तपशीलात जायला ? आणि जायचे तरी कशाला! कथाकादंबरी थोडीच लिहायची असते? व्याधीतून वाचला तर त्या रोग्याचे नशीब!, नाही वाचला तर डॉक्टरांच्या लेखी तो एक अयशस्वी प्रयोग दुसरे काय? पुढे खासगी धंदा करतेवेळी, भरपूर फी घेऊन तपासून घेणाऱ्या रोग्यावर उपचार करतांना लक्षांत ठेवायचे मैलाचे दगड. यामुळेंच 'डॉक्टर, ती यांतून वाचेल ना?' हा नेहेमीचा प्रश्न तिच्या नवऱ्याने आपल्याला विचारला नाही याचेहि डॉक्टरांना आश्चर्य वाटले नाही.

शेवंतीने पडल्यापडल्याच डोळे किंचित् उघडून पाहिले. काही थोड्याशा अंतरावर पांढरे कपडे घातलेला एक वॉर्डबॉय् ओवरीची फरशी स्वच्छ करीत होता. वावभर लांब असलेल्या दोरीच्या एका टोकाला बोटबोटभर लांब धागे

**आग–आग–आग पेटली होती. शरीर आणि मन भाजून गेलं होतं. जबानी दिली आणि सारं कांहीं शांत झाल्यासारखं वाटलं........**

असलेला लांवलचक बोळा होता. बादलीतल्या डेट्टॉलच्या मिश्रणांत तो बुचकळून फरशीवर दूर फेके. हातात दुसरे टोक घट्ट ठेवी. मग डावी–उजवीकडे विशिष्ट लयीत कलत तो बोळा आपल्याकडे खेचून घेई. फरशी स्वच्छ पुसून निघत होती. शेवंतीला वाटले, आपल्या शरीरावरही तो बोळा त्याने वरचेवर फिरवावा. त्या गार स्पर्शाने तेवढेच बरे वाटेल. किंवा आपणच फरशी होऊन त्या वॉर्डबॉयच्या पायाशी लोळण घ्यावी.

–इतक्यात स्ट्रेचर हलला. आंतली जागा मोकळी झाली होती वाटते. 'बाई जरा बाजूला सरकून घ्या' गाडी ढकलणारा शुष्कपणे म्हणाला. तिला शरीर हालवताच येत नव्हते. आपली असमर्थता व्यक्त करण्यासाठी तिचे ओठ किंचित् हलले. ढकलणारा तिच्या उत्तराची अपेक्षा थोडीच करत होता ? तोवर त्याने वॉर्डमध्ये गाडी केव्हांच ढकलून आणली. प्रवेश दरवाजापासून उजवीकडच्या तेराव्या पलंगावर जागा रिकामी झाली होती. नुकतेच अंथरूण बदलण्यात आले होते. दोघांनी तिला नेहेमीच्या सरावाने अलगद उचलून पलंगावर ठेवले. स्ट्रेचरची गाडी ढकलत ते बाहेर निघून गेले. वॉर्डामध्ये चाळीस खाटा होत्या. पन्नाससाठ रुग्ण होते. जागेच्या अभावी काहीना खाली जमिनीवर गादी पसरून झोंपवले होते. तिला तिच्या परिसराचे काहीं वाटत नव्हते. कुणाच्या कण्हण्याचा आवाज ऐकू येत नव्हता, कुणाचे खाकरलेले बेडके दिसत नव्हते. पांढऱ्याशुभ्र पोशाखात फिरणाऱ्या परिचारिकांच्या हालचाली तिचे डोळे निववीत नव्हत्या. ती नुसती निपचीप पडून राहिली होती. कानात ऐकू येत होती स्टोव्हची भरभर आणि नाकात कोंदून राहिला होता घासलेटाचा वास. तिच्या डोक्यांतील स्मृतीच्या चिंध्या-देखील घासलेटाने थबथबून भिजल्या होत्या. उरात आणि शरीरांत नुसतीच आग भरून राहिली होती. आठवणीच्या साखळीचे दुवेदेखील त्या आगीने वितळत होते. गळून खाली पडत होते. . .'मी वाचेन का हो यातून" हा प्रश्न तिला भेडसावीत नव्हता. तिला भक्त आगीतून मुक्त व्हायचे होते. कोणीतरी बेशुद्ध केले असते तरी चालले असते. पण तेच झाले नव्हते. शुद्धबुद्ध होती. म्हणूनच आग सहन होत नव्हती, आठवणीचे चटके मनातून विसरत नव्हते.

तासाभरात कोणीतरी बूट खाडखाड वाजवीत आले. शुद्धिबेशुद्धीच्या सीमारेषेवर रेंगाळणाऱ्या शेवंतीने डोळे किंचित् किलकिले करून पाहिले. पलंगाच्या कठड्याची नळी पकडलेली तीनचार दणकट राकट बोटे दिसली तिला. त्या बोटांच्या पेरांवरचे केसांचे पुंजकेही दिसले.

स्टूल सरकवून कोणीतरी जवळ बसल्याचा भास झाला तिला.

"काय झालं बाई? तुमचं अंग कशानं भाजलं ?"

कोणीतरी देवदूत चौकशी करीत होता.

"स्टोव्हमुळं भाजलं. . ." तिनं अडखळत उत्तर दिलं.

"स्टोव्ह तुम्ही पेटवला होता?"

क्षणभर शांतता.

"हो."

"एकदम कशानं भडकला स्टोव्ह?"

कशाने? खरंच, कशाने भडकला स्टोव्ह? कच्चे तेल वर उसळले वाटते! का टाकी फुटली?

"बाई, खरंखुरं सांगून टाका, काय झालं ते. तुमचं नि तुमच्या नवऱ्याचं बरं नव्हतं काय?" . . राकट बोटे बोलली.

खरं. . .खुरं. . .? हां. .हां. .आठवलं. . .कोणाच्या तरी हातून रॉकेलची बाटली अंगावर उपडी झालेली आठवली रंगपंचमीला पोरं शिशीमधून रंग उडवतात तसं घासलेट शिंपलं जात होतं. . अंगावरचा पदर मुद्दामच खेचला गेला आणि त्याचे टोक जळत्या स्टोव्हवर धरले गेले होते. पेटल्या स्टोव्हमुळं आग लागली होती हे खरेच होते. आतां कोठल्या मर्यादेपर्यंत खरं सांगायच? आणि सारं सांगायला अवसर तरी कुठे होता? आयुष्याचे घडचाळ मिनिट–सेकंद मोजीत होते. आगडोंब उसळला होता. साऱ्या शरीराला ओली लाल संकेश्वरी मिरची वाटून तिचा लेप लावल्यासारखे वाटत होते. . . .मग एकाएकी तिच्या मनातला संतापहि उसळला, स्टोव्हमधील कच्चे तेल उसळल्यासारखा ! किंचित अडखळत, थकल्यासारखी पण प्रत्येक शब्दावर जोर देण्याचा प्रयत्न करीत ती पुटपुटली.

"नवऱ्यानं ना?" पुनः एकदा खात्री करून घेण्यासाठी तिच्या कानाशी तोंड नेऊन केलेला प्रश्न.

ती फक्त संमतिदर्शक मान हलवते.

इतक्यांत सांपळ्यातून बाहेर पडू पाहणारा उंदीर खडबडू लागतो. चारी बाजूला भरभक्कम तारांचे जाळे. पिंजरा हातात धरलेल्या जाडजूड इसमाकडे तो लुकलुकत्या लुब्र्या नजरेने बघायला लागतो. त्या इसमाच्या बोटांच्या पेरांवरचे केसांचे पुंजके त्याला वाकुल्या दाखवीत असतात. उंदीर म्हणू लागतो, "साहेब मला बाहेर काढा यातून!" पिंजरा हातात धरणारा खदखदून हसतो. पिंजऱ्याला धक्के बसतात त्या हंसण्याने. आपल्या एका हाताचा तळवा उघडून तो पिंजऱ्यासमोर धरतो. त्या तळव्यावर पुष्कळ आकडे दिसू लागतात चित्रविचित्र. श्रावणातल्या गौरीच्या मडक्यावर पिवडीने रेखाटलेल्या आकृतींसारखे चित्रविचित्र !

त्या जाडजूड माणसाच्या मनांत त्या उंदराची खडबड रेंगाळत राहते. तो मनांत पुटपुटतो–"एकूण त्या साल्याची बातमी खरी तर." मग शेजारी उभ्या राहिलेल्या २४७७ ला तो बोलतो. "पळत जा टॅक्सी घेऊन. कोपऱ्यावरच्या जे. पी. ला घेवून ये."

"सावंत ना साहेब?"

"हो, हो, तेच. नसले तर डॉ. हुमण्यांना घेऊन ये."

"वरं. . . ." सलाम ठोकून चोवीस सत्त्याहत्तर निघून जातो.

शेवंतीला ग्लानी येऊ लागल्यासारखी वाटते.

थोड्या वेळाने पुन: कोणीतरी बोलत असल्याचा भास होतो.

"Any hopes of survival, doctor?"

"Very bleak."

"पण जबानी देऊ शकेल ना!"

"निश्चितपणे. तिला चांगली जाणीव आहे."

"मग घेऊ तिचा जबाब?"

"काहीच हरकत नाही."

"बाई. . .शेवंतीबाई. . ." जे. पी. दबल्या आवाजात हांक मारतात. शेवंती डोळे उघडून पाहते. हा नवा चेहरा कोणाचा? अन् मघाचा कोण तो! पुन: पुन: तेच तेच काय विचारताहेत? काय त्यांचा नि माझा लागेबांधा? तिला काही समजत नाही. ती काहीतरी सांगू लागते. जबानी झाल्यावर त्यावर जे. पी. ची आणि डॉक्टरांची सही होते.

"या वॉर्डात कसं ठेवता येईल आता? ही पोलीस केस आहे" कुणीतरी सुचविते. अर्ध्या तासात शेवंतीची दुसऱ्या वॉर्डात रवानगी होते.

डॉक्टरांनी लावलेल्या औषधामुळे थोडा उतार पडलेला असतो. टेंपरेचर घेण्यासाठी आलेल्या सिस्टरला ती विचारते. . . "मी जगेन का हो यातून?"

सिस्टर मंदस्मित करते फक्त. . आणि आश्वासनपूर्वक मान हलवते.

हे सगळे आश्वासन खोटं आहे, तिला जाणवते. आता नको कोणी यायला. असंच स्वस्थ पडून राहावं. बेशुद्ध व्हावं आणि त्या अवस्थेत मरण यावं. . .साऱ्या वॉर्डभर शांतता असते. कुठेहि हालचाल नाही. वॉर्डाच्या एका टोकाला टेबलापाशी बसून एक जाडजूड नर्स कागदांची चाळवाचाळव करीत असते, तेवढाच काय तो आवाज.

दुपारचे चार वाजून जातात. उन्हे कलतात. नर्सच्या टेबलावरच्या आच्छादनावर सूर्याची किरणे पडतात. आच्छादनावर विणलेली पांखरे जिवंत होऊन उडू पाहतात. रुग्णांना भेटायला येण्याची वेळ झालेली असते. वॉर्डात वर्दळ सुरू होते.

"वहिनी. . .वहिनी. ." एक पँटवाला तरुण हाका मारतो.

शेवंती किंचित् जागी होऊन डोळे उघडून पाहते. कोण हाका मारते आहे हे तिला ओळखता येत नाही.

तो पुन: साद घालतो. . . "वहिनी. . वहिनी. . . ."

"कोण?"

"मीच. सदू. .सदाशीव. कसं आहे तुला वहिनी?"

"मी ह्यातून फार वेळ जगणार न्हाई सदा. . ."

"सकाळीं तुझा जबाब घेतला ना?"

"व्हय."

"घोटाळा झाला सगळा. दादाला पकडलं ना त्यांनी."

तिने डोळे मिटून घेतले. काही वाईट झालं नाही. पकडलं तर. आठ दिवसापूर्वीची शिवीगाळ आठवली तिला. त्या हजार शिव्यामध्ये सदूचे नांव कसं लॉकिटसारखं गुंफून टाकलं होतं त्यानं. कदाचित् त्याला माहिती नसावं. . . सांगावं का सदाला सगळं? पण नकोच. .

"वहिनी. . .कशाला जबाव दिलास असा तो?"

"मरणाच्या उंबरठ्यावर हुवं राहून खोटं बोलू काय ? सदा. . .?" तिच्या काळ्या ठिक्कर पडलेल्या चेहेऱ्यातील चकाकणाऱ्या त्या हिरव्या डोळ्यांकडे त्याला पाहवेना. तो खाली मान घालून चूप बसला. त्याला मघाचे वकीलाचे बोलणे आठवले. "तुमच्या भावजयीने जबानी फिरवली तरच तुमच्या दादाला वाचविण्याची काही आशा आहे. ती जगली तर प्रश्नच नाही. पण हा जबाब कायम ठेवून ती जर मेली तर मात्र त्याला वाचविणे कठिण आहे." दुपारी चार तास वकीलाबरोबर उरफोड करून त्याला हाच सल्ला मिळाला होता. शेवंतीचं ते निर्धाराचं बोलण ऐकून सदा सर्द झाला.

"वहिनी झाल गेल विसरून जा. किती झाल तरी तो तुझा. . ."

"गेल्या जन्माचा वैरी तो. . ." ती उसळून म्हणाली.

मग काहीसा विचार करून सदा बोलला. . .

"त्याचं एक जाऊं दे ग वहिनी. पण त्याला फांशी झाली तर तुझा काय फायदा होणार आहे ? तुझी दोन्ही मुलं' उघड्यावर पडतील त्याची काय वाट? त्यांच्याशी तर त्याचा वांकुडपणा नव्हता. . . .?"

तिच्या मनांत भडकलेला स्टोव्ह हळू हळू शांत होतो. स्टोव्ह अदृश्य होतो. राहतात दोन बारीक छोट्या मेणवत्त्या संथ तेवणाऱ्या आणि हळूच मेणांचे अश्रू टपकणाऱ्या मेणवत्या!

वात झाल्यासारखी ती वडवडू लागली. "आणा जा त्या सकाळच्या बाबाला. . . काय पाह्यजे ते लिवून घ्या म्हणावं. . जा. आणा बोलावून त्या सकाळच्या बाबास. . . ."

सदा झट्दिशी उठतो. क्षणभर एक टक पाहतो तिच्याकडे. ती खरंच बोलत आहे की, भ्रमांत बडबडत आहे? कांही का असेना जे. पी. ला गाठलं पाहिजे असंच. वेळ घालविण्यात अर्थ नाही. तो पाठमोरा होऊन झपाझप चालू लागतो. . .

त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे डोळे लावून शेवंती बडबडत रहाते. घटकाभर विसरलेली आग परत उसळते. वेदना सुरू होतात. टाळू कोरडी पडू लागते. "पाणी. . .पाणी द्या कोणीतरी."

नर्सेसमध्यें गडबड सुरू झाली. "डॉक्टरना बोलावल पाहिजे. सिस्टर प्रेशर कमी कमी होत चाललं आहे." तिची नाडी हातात धरून एक सिस्टर बोलली.

वॉर्डातील भिंतीवरच्या घड्याळातील सेकंद काटा साठ घराचे आवर्तन करीत पळत सुटला होता. पुन: वार्डामध्ये बूट वाजले. जे. पी. आले, सदा आणि त्याचे वकील पण आले. सकाळचा जाड बोटांचा इसमही आला. . .

त्या तिघांकडे आळीपाळीने पहात शेवंतीला तपासत असलेल्या डॉक्टरांनी फक्त मान हलवली.

सदाचा तळवा घामेजून ओला झाला होता.

त्या जाडजूड इसमाची दणकट बोटे एकदम लुळी पडली! ●●●



अनुक्रमणिका







**योगायोग आणि अपघात ● सांकेतिक चित्रण ● रसिक वाचकांचा कौल**

## योगायोग आणि अपघात

**मुंबई** मराठी ग्रंथसंग्रहालयातर्फे घेण्यांत आलेल्या कादंबरीस्पर्धेत पारितोपिक देऊन गौरविलेली ही एक कादंबरी. वा. शि. आपटे या लेखकाने स्वतःच्या यशाचा पाया ही कादंबरी लिहून भक्कम केला आहे. ही कादंबरी ह्मणजे एका विवाहित क्षयी स्त्रीची कथा होय. कादंबरी शेवटपर्यंत वाचली जाते. कथानकावरची तिची पकड कायम आहे हा या कादंबरीचा महत्वाचा विशेष. यशस्वी आत्मपरता हा दुसरा विशेषः जान्हवी व शैलेश या पती पत्नींच्या आत्मनिवेदनाने कादंबरी गुंफली आहे.

संसारसुख न मिळालेल्या जान्हवीच्या जीवनांत पुष्पराज हा तरुण येतो. हॉस्पिटलमधले तिचे जीवन या नव्या ओळखीने वहरू लागते. तिचे जीवन बदलु लागते तोच शैलेश (तिचा नवरा) येत असल्याची तार येते. ती सासरी जाते. पुष्कराज एकाएकी मरतो. सरिता या आकर्षक नर्सच्या सहवासांत शैलेश येतो. तिला दिवस जातात. मातृत्वाची चाहूल लागल्यानंतर शैलेश विवाहित असल्याचे सरिताला समजते. सरिता शैलेश पासून दूर जाण्याचा प्रयत्न करते. शैलेशच्या संबंधातून जन्मांस आलेली मुलगी सरिता त्याच्या बंगल्याच्या दारांत ठेवते. सोबत एक मोठे पत्र जान्हवी साठी ठेवून देते. जान्हवी मुलगी ताब्यांत घेते. शैलेश सर्व काही समजतो. इथे कादंबरी संपते.

ही कादंबरी आत्मनिवेदन पद्धतीने लिहिल्यामुळें तिला एक प्रकारची अंतर्मुखता प्राप्त झाली आहे. जान्हवी व शैलेश या दोन व्यक्तिरेखांच्या आत्मनिवेदनांतून कादंबरी आकारूं लागते. त्यामुळें कादंबरीतील मनोविश्लेषणाला एक उंची प्राप्त झाली आहे. शैलेश आणि जान्हवी यांच्या अंतर्मनांतील संघर्ष कादंबरीची कलात्मकता वाढवितो. त्यातूनच निर्माण होणारा शैलेशचा ताठरपणा व जान्हवीची विनम्र वृत्ती हा संघर्ष त्या दोन्ही व्यक्तिरेखा जास्त आशयघन करतो. या दोन्ही व्यक्तिरेखांच्या निवेदनांतून सरिता पुष्कराज यांचे दर्शन घडते. सहनशील, मातृत्वाची जोपासना करणारी 'सरिता जितकी' मन वेधून घेते तितकेच पुष्कराजचे रेखाटन फिके ठरते. पुष्कराज आकस्मिकपणे मरतो हेहि या फिकेपणाचे आणखी एक कारण आहे.

'तुझं कांहीं माझं काही' मध्ये योगायोग व अपघात पण बरेच आहेत. पुष्कराज एकाएकी मरणे, त्याचे माया जान्हवीला भेटणे, शैलेशचा मोटार अपघात, डेहराडून मिलिटरी कॅंपमध्ये शैलेश सरिता यांची भेट इ. कादंबरीतील योगयोग तिच्या वास्तवतेला बाध आणतात प्रस्तुत कादंबरीतील योगायोगाविषयी सुद्धा असेच म्हटले पाहिजे.

वा. शि. आपटे यांची लेखणी मोजक्या शब्दांत प्रसंगचित्रें व व्यक्तिचित्रे उभी करते. एक हळुवार काव्यमयता त्यांच्या शैलीला लाभली आहे. कादंबरीतील शेवटचे सरितेचे पत्र वरील सर्व वैशिष्टयांची ओळख पटविण्यास पुरेसे आहे. आपल्या लेखणगुणांनी एक चांगली प्रेमकथा वा. शि. आपटे यांनी यशस्वीपणे हाताळली आहे.

तुझं कांहीं, माझं कांही–ले. वा. शि. आपटे

## सांकेतिक चित्रण

**मुंबई** मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या कादंबरीलेखन स्पर्धेत बक्षीस मिळालेली द. पां. पेंडसे यांची 'धूसर ढग' ही कादंबरी आहे.

सकस वाङमयाची प्रवृत्ति वाढीस लागावी असा हेतु स्पर्धाचालकांचा होता पण 'धूसर ढग' वाचल्यावर मात्र निराशा येते एका सामान्य विषयाची हाताळणी करण्याचा प्रयत्न लेखकाने या ठिकाणी केला आहे. कथानकातील रहस्यमयता व आदर्शवादी विचारसरणी हे कादंबरीचे जुने विशेष भूतकालांत गडप झाले. आहेत. धूसरढग ही कादंबरी याच ठरीव संकेतांवर उभी राहिल्यामुळे आकर्षक होऊ शकली नाही असें म्हटले पाहिजे.

कादंबरीचा नायक मुकुंदा हा एक इंजिनियर आहे. अवंती ही सिनेमा नटी स्वतःच्या क्षेत्रांतील आमिषे दूर सारून (वस्तुतः हे कठीण नाहीं काय?) मुकुंदावर मनापासून प्रेम करते. याचवेळी मुकुंदाचा बकुळाबाई या गायिकेशी व रुक्मिणी या तिच्या मुलीशी परिचय होतो. (इंजिनियर असूनहि, मुकुंद तबला छान वाजवितो. यामुळें हे घडते!) रुक्मिणीशी मुकुंदाचा संबंध येऊ नये म्हणून मुकुंदाची आई आटोकाट प्रयत्न करते. ती फार अस्वस्थ होते. अनंता या मुकुंदाच्या मित्राला ण याविषयी आश्चर्य वाटते. याठिकाणी कादंबरीची रहस्यमयता सुरूं होते व थोडयाच वेळांत ती संपुष्टांत येते. कादंबरीची सुमारे पन्नास पाने वाचून झाल्यावर साधारणपणे रहस्यमयतेचा धागा आपोआप उलगडत जातो. नव्हे ती रहस्यमयतेची पार्श्वभूमि वाचकाच्या लक्षांत येते. रुक्मिणी ही मुकुंदाच्या वडिलांची, बकुळाबाईशी संबध आल्यामुळे जन्माला आलेली मुलगी होय. अर्थात हे रहस्य कादंबरी थोडीफार वाचल्यावरच लक्षांत येते हें कादंबरीचे अपेश










होय. या सांकेतिक रहस्यमयतेने कादंबरीला गालबोट लावले आहे. शेवटी बकुळाबाई व मुकुंदाची आई यांची भेट होतें. अनंताचे रुक्मिणीशी सूत जमते. (पर्यायाने मुकुंदाच्या आईच्या मनावरील ओझे कमी होते.) मुकुंदा व अंवती यांचे लग्न निश्चित होते. अशा तऱ्हेने कादंबरीचा शेवटहि अगदी ठरीव आहे. थोडक्यांत म्हणजे आनंदी आनंद!

मुकुंदाच्या आईच्या मनांतील घाल ़ ल आकर्षक आहे. पण मुकुंद–अंवती यांच्यातील संघर्ष अगदी ठिसूळ आहे. अगदी गरीब परिस्थितींतून वर घेऊन नटी बनलेली अवंती मुकुंदावर मोहित होते. (ही सुद्धा एक अनपेक्षित बाब!) मात्र त्यांच्या मीलनांत एकच अडचण आहे. ती म्हणजे मुकुंदाने विवाहानंतर अवंतीच्या घरी येऊन राहावे ही होय शेवटी अंवतीला आपली चूक कळते. हा संघर्षहि संपतो.

उपरोक्त पात्रांच्या बरोबरच आणखी एक गौण पण लक्षांत राहण्याजोगी व्यक्तिरेखा श्री. पेंडसे यांनी निर्माण केली आहे. ती म्हणजे शहा शेटजींची व्यक्तिरेखा होय. काही ठराविक प्रसंगातून एक सदैव गडबडींत असलेला व सर्वांची मने आकर्षून घेणारा 'शहा' चांगला वाटतो. बकुळाबाईची व्यक्तिरेखापण बरी आहे. धूसर ढग' हे प्रतीकान्त्मक नांव मुकुंदाच्या आईच्या मनस्थितीचे निदर्शक आहे, तसेंच अंवतीच्या पण! लेखकाच्या भाषेंत सहजसोपेपणा व संवादात साधेपणा आहे. पण विषयाच्या सांकेतिकपणामुळे कादंबरीचे यश मर्यादित ठरते!

[धूसर ढग — द. पो. पेंडसे]

## रसिक वाचकांचा कौल

**१९६२** सालच्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेल्या कथांपैकी महाराष्ट्र टाइम्सच्या वाचकांना सर्वांत जास्त आवडलेल्या अशा अकरा कथांचा मोतीचूर संग्रह आहे.

वाचकांची अभिरूचि समजावून घेण्यासाठी महाराष्ट्र टाईम्स'ने ही योजना अमलांत आणली. यो ़नेकडे पाहतांना काही धोकेहि समोर उभे राहतात. दिवाळीची प्रचंड संख्या व सामान्य वाचकाचे वाचन–यावर आधारलेला कौल कितपत बरोबर ठरेल हा प्रश्नहि निर्माण होतो. (अर्थात् या उपक्रमाच्या धोक्याची जाणीव संयोजकानाहि होतीच.)

सामान्य वाचकांची ओढ घटनावैचित्र्याकडे असा निष्कर्ष हा कथासंग्रह वाचल्यावर सहज काढता येतो. मराठी कथेच्या कक्षा यावेळपर्यंत खूपच रूंदावल्या आहेत. आशयाच्या दृष्टीनेहि ती खूपच बदललेली आहे. त्यामुळे वाचकांनी निवडलेल्या या कथा एका मर्यादित अर्थीच चांगल्या ठरतील. (उदा. 'जौळ'या मधुमंगेश कर्णिकांच्या वैशिष्टचपूर्ण कथेऐवजी 'भुजंग'ची निवड वाचकांनी केली आहे. जी गोष्ट 'भुजंग'ची तिच 'वेणा' (शंकर पाटील), 'मोनालिसा' (विद्याधर पुंडलिक) औदुंबर (श्री. दा. पानवलकर), पराभव (जी. ए. कुळकर्णी) या काही कथांची.

या संग्रहात जास्तीत जास्त कथा ग. ल. ढोकळाच्या आहेत. त्यांच्या 'दगडफूल', मध्यस्थ' व 'नटमोगरी' या कथांत जास्त सरस वाटते ती दगडफूल. एका प्रतिष्ठित माणसाच्या पत्नीचा नैतिक अध:पात रंगविण्यांत ठोकळ यशस्वी ठरले आहेत. धक्का देणारा नाटचपूर्ण शेवट हे या कथेचे महत्वाचे वैशिष्टच 'नटमोगरी' ही ठराविक ग्रामीण सांच्यातील एक कथा.

ग्रामीण पार्श्वभूमीचा विचार केल्यास 'सजा' (ग. दि. माडगूळकर) व भुजंग (मधुमंगेश कर्णिक) या दोन कथा जास्त अस्सल वाटतात. 'सजा' ही एका रामोशी मुलाची. मुसलमानावर खरें प्रेम करणाऱ्या, चांगीची कथा. गांवाने जोंडे मारून हैराण केल्यावर चांगी वाकळ धरते ती पुन्हा उठत नाहीं. मुसलमानावर प्रेम केल्यामुळे सजा मिळते ती मृत्यूची पण आधी तिच्याशी संबध ठेवणारी पाटलांची पोरं नामानिराळी राहतात हें आणखी एक सत्य.

'भुजंग' ही एका स्त्रीची निष्ठा व्यक्त करतें. असहाय स्त्रीवर नजर ठेवणाऱ्या तलाठ्याला एक विस्मयकारक दृश्य दिसते. फडा उंचावून डोलत असणाऱ्या भुजंगाला ती स्त्री गाऱ्हाणे घालते. त्या पापी माणसाला उसायला सांगते. तलाठी ते विस्मयकारक हृश्य पाहून निघून जातो. तिला आणखी वळ चढते. कोकणांतील दुबळी माणसे ज्या श्रद्धास्थानांवर विश्वास ठेवतात त्यांतील राखणदार भुजंग हें एक कर्णिकांच्या कसदार लेखणीनें कोंकणीजीवनांतील एक नाटचपूर्ण क्षण यशस्वीपणे टिपला आहे. (इथे आणखी एक मुद्दा नमूद करावासा वाटतो. वाङ्मयशोभेच्या दिवाळीत अंकात प्रसिद्ध झालेली कर्णिकांची 'जौळ' ही कथा भुजंगपेक्षा जास्त रेखीव व जीवनदर्शी वाटते. पण 'मोतीचूर' मध्ये समाविष्ट झाली जास्त विस्मयकारक अनुभव व्यक्त करणारी भुजंग! याचे कारण वाचकांचा कौल त्यांची घटनाप्रधानतेची आवड.)

'विन्घहर्ती' ही अरविंद गोखल्यांची उल्लेखनीय गोष्ट या संग्रहात आहे. पुतण्याच्या नियोजित वधूला अपयश येऊ नये म्हणून मृत पतीच्या प्रेताजवळ विवाह उरकेपर्यंत बसून राहणारी खंबीर व तेजस्वी स्त्री या कथेंत गोखल्यांनी रेखाटली आहे.

'आडोसा' (ना. सी. फडके) व 'शेपटा' (पु. भा. भावे) या कथा या संग्रहांत समाविष्ट केल्या गेल्या आहेत. या कथा म्हणजे एका ठराविक चाकोरींतल्या त्याच आवर्तनांत फिरणाऱ्या कथा आहेत. असे म्हटले पाहिजे.

"मोतीचूर" हा कथासंग्रह वाचून सध्याच्या कथेविषयी काही निष्कर्ष जरी काढतां आले नाहींत तरी वाचकांना काय पाहिजे हे निश्चित समजते. पण वाचकांची आवड आणि वाङमयीन दृष्टचा वरच्या दर्जाची कथा यांचे नाते जवळचे नाही हे लक्ष्यांत घ्यावयास हवे"!

[मोतीचूर–प्रकाशक–भारतीय ग्रंथभवन]

–प्रा. वि. शं. घुचौले




अनुक्रमणिका



## असे पाहिले असे ऐकले

### पुरुषोत्तम (बाजी) देशपांडे

अहो, वचनभंगाच्या, फसवणुकीच्या ह्या जमान्यात दिला शब्द पाळला गेला. – शब्दसृष्टीचे ईश्वर 'कृति' शूर बनले, एक मनुष्य उठतो आणि एकटयाच्या हिंमतीवर भली मोठी रक्कम 'दान' करतो आणि वर म्हणतो की, मी 'कार्तव्य' केले. स्वागत, सत्कार नकोत. किंबहुना हे घडून जाते तरीहि 'हे घडणार आहे हो' अशी थोडीशीसुद्धां जाहिरात तो ह्या 'प्रसिद्धी भिक्षूंच्या' जमान्यात करीत नाही. सर्वत्र 'दिले पाहिजे' याचा प्रचार होतो. पण दिले जातात फक्त शब्द ! आश्वासने, कोरडे वर. कृत्रिम हास्य आणि त्याचे तेच ते फोटो ! पण दानाचे शब्द खरे करणारे कर्ण–हरीश्चंद्र एकूण विरळाच ! पण कधी कधी असा चमत्कारही ह्या प्रांती घडतो म्हणायचा! कौतुक नको म्हणणाराचे म्हणून तर तुम्ही आम्ही कौतुक करायचे ! आमचे पु. ल. देशपांडे हे 'बाजी देशपांडे' नव्हते. पण रक्ताची जातं तीच बरं का ! इमान तेच ! सच्चाई तीच ! जिद्द तीच. अशीच दिलं म्हणत देऊन टाकण्याची ! कठिण ! लई कठिण आहे हे ! बघा (नुसता) विचार करूस ! आमचे जवान तिकडे लाहोर –सियालकोटवर विजयी झेंडे मिरवीत गेले ना, तेव्हां आमच्या जवानांना रक्ताची गरज होती. ते रक्त इमानी हवे होते. देशपांडयांनी रक्त दिलेच पण आणि एक संकल्पही दिला. आणि पाळलाही ! 'हंसविण्याचा धंदा' केला. एका माणसाच्या जिद्दी प्रयत्नातून त्यांनीं चाळीस हजार रुपये उभे केले आणि रक्त पेढीला ए ः रकमी देऊन ट कले ! फेंट येऊं देऊं नका. हे अक्षरशः खरे आहे. एक रुपया वर्गणीसाठीही घांसाघीस करणाऱ्या माणसांच्या ह्या जमान्यात एकादा 'पुरुषोत्तम' अशी 'बाजी' लावूं शकतो हे खरं तर सुचिन्ह ! तोफेचे बार होईपर्यंत खिंड लढवीन म्हणत छातीची चाळण होईपर्यंत बाजी लढला पण शब्द राखला. आमच्या देशपांडयांनी "रक्ताची पेढी" मोठी व्हावी म्हणून स्वतःलाच दिलेल्या शब्दांशी इमान राखले. एक कुदळ मारून पन्नास फोटो काढायला लावणाऱ्या जमान्यात ह्या 'बाजी' देशपांड्याने स्वतःच्या निढळाच्या कलासाधनेतून चाळीस हजार रुपये ह्या 'लोककार्यी' दिले ही गोष्ट मला फार फार मोठी वाटते. प्रत्येक राष्ट्रीय आपत्तीचे 'भांडवल' करणाऱ्या ह्या जमान्यांत स्वतःच्या श्रमांचे भांडवल करून राष्ट्रीय पत वाढविणारे देशपांडे विरळाच (आणि म्हणूनच अभिनंदनाचे धनी).

## (तथाकथित) नाट्य समीक्षा

मराठी नाटके आणि आजचे (तथाकथित) नाटयासमीक्षक ह्या मंडळींची मोठी गंमत चालू आहे बरं का ! एखादे नवीन नाटक लागले की, दुसऱ्या दिवशीची (वा नाटकी 'वारांची') वृत्तपत्रे वाचावी. आगळे क्रांतिकारक, भिकार, टुकार, नवा इतिहास लिहिणारे वगैरे शब्दांची खैरात होते. (फुकट शब्दांचेही पैसे मिळतातच की) आणि मग ते नवे, क्रांतिकारक आगळे नाटक केव्हा 'इतिहास' जमा होते तेही कळत नाही. आणि भिकार म्हणून नोंदविले गेलेले नाटक गाजवून जाते 'शंभरी' आणि नोंदवला जातो नवा इतिहास ! 'रायगड' तर बोलून चालून 'ऐतिहासिक' (सर्वार्थाने) नाटक ! तिथेही 'अंदाज' चुकले. 'टीका' फसल्या. योजनाबद्ध टीका ही उपयुक्त ठरल्या नाहीत. पण 'मत्स्यगंधा' हे नाटक मात्र भाग्यवान बरं का ! सिंह मुखाने भविष्य कथिले गेले. नाडी पाहिली गेली. बाळ 'रिकेटी' असल्याची ग्वाही दिली गेली. कुणाला म्हणे अश्लीलतेचाही शोध लागला. (तुम्ही बघाहो लावून–मला तसं कांही सांपडल नाही) पण नाटकाबाबतची ः री 'कृष्ण' भविष्ये खोटी ठरली. अखेर शब्दांचे 'गुलाम' असणारांना शब्दांच्या सच्चाईची ही भिष्म कथा (जणुं) कळलीच नाही. 'रायगडा'ने ती 'कथा' ओळखली आणि दोघांनी एक नवा इतिह स घडविला! 'मत्स्यगंधा' ने 'शंभरी' गाठली. माजी सर न्यायाधीश गजेंद्रगडकरांनी आशिर्वाद दिले. व दोनश्याव्या प्रयोगाचे वेळी प्रेक्षकात तरी हजर राहण्याची संधि मला मिळो. अशी इच्छा व्यक्त केली. 'मत्स्यगंधे'चे संगीत, मत्स्यगंधेचा विषय आणि प्रायोगिक यश आतां सिद्ध झाले आहे. नाटयप्रयोगातून मिळालेले हे यश कौतुकास्पद आहे. तथाकथित नाटय समीक्षकांना प्रेक्षक रसिकांनी दिलेले हे उत्तर समजायचे काय? समजूं या झालं. तुमचीही हरकत नसेलसं वाटतं.





अनुक्रमणिका

# शून्यातुनि निर्मिली ब्रह्मांडे

**जिवन्त** माणसाचा फोटो काढणे. त्याच्या जीवनावर 'फिल्लम्' काढणे. त्याचे चरित्र (त्यालाच विचारून) लिहून काढणे. त्याच्या (खऱ्या खोट्या) आठवणी रंगवून रंगवून सांगणे (व भाव खाणे) वगैरे गोष्टी शक्य असतात. पण नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांच्या काळांत कॅमेरेही कमी, कॅमेऱ्याची हौसही कमी आणि कुदळ फावडी मारली की फोटो काढून घेणारी (व त्यातच डवरलेली शेते पाहणारी) माणसेही कमी होती. त्यावेळी माणसे कार्य करीत. कमी बोलत आणि वृत्तपत्रातही कमी वेळा छबी छापून आणीत. त्यामुळे गोखले जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या जीवनावर आधारित अनुबोधपट तयार करणे ही एक तारेवरची कसरतच होती. गोखले असे असे दिसत हे दाखविणारी जेमतेम दोन तीन छायाचित्रे हाताशी होती. बाकी सारे त्यांच्या जीवनकथेतून शोधून काढायचे, चित्रित करायचे आणि त्याला सजीव करण्याचा प्रयत्न करायचा येवढेच उरते. ते धाडसाचेच नव्हते काय? हाती मूळ 'शून्य' (दोन फोटो फक्त)पण दाखवायचे मात्र 'ब्रह्मांड' (गोखले यांचे व्यक्तित्व ब्रह्मांड सदृश होतेच होते). पण महाराष्ट्र राज्य शासनाच्या सहकार्याने श्री. गोविंदराव घाणेकर यांनी आपल्या 'सह्याद्रि' फिल्म्स् तर्फे 'भारत सेवक' हा जो अनुबोधपट तयार केला आहे, तो पाहिल्यानंतर मात्र हे 'ब्रह्मांड' त्यांनी समर्थपणे पेलले व चित्रित केले आहे ह्याची खात्री पटली. त्यासाठी त्यांनी चित्रकार श्री. काटे ह्यांचे सहकार्य घेतले आणि त्यांनी चित्रित केलेल्या शेकडो (अक्षरशः शेकडो) चित्रांवर भर देऊन अगदी नव्या पद्धतीचा हा अनुबोधपट सादर केला आहे. हलती माणसे सजीव चित्रपट तयार करूं देतात. ह्यात ती चित्रे हलते जीवन चित्र उभे करण्याचा प्रयत्न करतात. त्यावेळी 'टेप'ची सोय नव्हती. नाही तर गोखल्याचे 'शब्द' ह्या अनुबोधपटाला लाभले असते. ह्या चित्रांत. ना. गोखल्यांच्या बालपणापासून ते महानिर्वाणापर्यंतच्या अनेक निवडक व चांगल्या घटनांची नोंद पहायला मिळते. म. गांधींनी पुढे केलेल्या मिठाच्या सत्याग्रहाची 'गंगोत्री' येथे दिसते परदेशी मालावरील बहिष्कार, पुढील अनेक राजकीय सुधारणांचा श्रीगणेशा तिथे दिसतो. अनेकविध चित्रांतून एका प्रचंड व्यक्तिमत्वाचे दर्शन घडते आणि मन थक्क होते. पटकथा व भाष्य तर उत्तम प्रकारचे आहेतच. पण छायाचित्रकार श्री. कामत—घाणेकर यांनी स्थिर चित्रांना जे 'सजीवत्व' दिले आहे. त्यांना बोलके केले आहे, त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करणे अगत्याचे आहे. एका अविषयाला (साधनाभावी) एक असामान्य 'व्यक्तित्व' त्यांनी दिले आहे. त्यामुळेच भारतसेवक नामदार गोपाळ कृष्ण गोखले ह्यांच्या थोर व्यक्तित्वाचा सजीव, सचित्र व सुबोध परिचय करून देणारा एक यशस्वी अनुबोधपट काढणे त्यांना शक्य झाले आहे. श्री. घाणेकर अँण्ड कंपनी झिंदाबाद ! !.

# 'विच्छा' पुरी होते

आमच्या वसंतराव सबनिसांच्या 'विच्छा माझी पुरी करा' हा पंचविसावा प्रयोग नुकताच झाला. (केला नाही) आणि मुळांतच चांगल्याला 'चांगलं' म्हणण्याची संधि मराठी माणसांना मिळाली. तमाशा—नव्हे नव्हे लोकनाट्य का काय म्हणतात ना ते हाय होय ! पण अस्सल लोकनाट्य! पांढरपेशी माणसे 'तमाशा' ह्या नावाला (व त्यांतल्या प्रकारांना) विटतात. बिचकतात म्हणून आपलं 'लोकनाट्य' म्हणायचं. पण तमाशातला चांगला भाग, त्यातली चांगली रंजक वैशिष्टये कायम ठेवून वसंतरावांनी हे लेखन केले आहे. तमाशात खालच्या दर्जाचे (व भागाचेही) विनोद जास्त असतात. सारे श्लेष एकाच विषयाभोवती घोटाळत असतात. त्यातली कृति आणि बोलणे हे ही असेक एकाच परिघात फिरत असतात. पण सबनीसांच्या ह्या लोकनाट्यात तमाशाची 'प्रकृति' कायम (व निकोप) ठेवून त्यातली 'विकृति' नेमकी टाळली आहे. ह्यातही श्लेषात्मक भाग आहेच. त्यातून निघणारा 'ध्वनि' सोवळ्याना पचणार—रुचणार नाही (त्याना काय रुचते म्हणा) पण ह्यांत श्लेषापेक्षा भर आहे तो निर्भेळ विनोदावर'! शाब्दिक आणि प्रसंगनिष्ठ ही! ! त्यामुळें 'तमाशाचा इफेक्ट' येऊनही 'विरस' मात्र होत नाही. मन दिलखुलास हंसत राहत. ती तमाशाची 'पातळी'ही सोडली आहे. पण पांढरपेशी गरीब. गुळगुळित पातळीही त्यांनी गाठलेली नाही. त्यात तमाशाचा रगेल रंगेलपणाही कायम राखला आहे. स्वत: सबनीस त्यात 'दिसतात' (तसे ते नसतात हं—गैरसमज नको) बरं वाटतं. त्यांची ही पहिलीच खेप! पहिलटकरणीसारखीच कांहीशी लाजरी, बुजरी! पण लवकरच ही 'स्टेज' जाईल आणि तेही 'स्टेज'वर 'मीच त्यो' म्हणून उभे राहतील (असा विश्वास येतो.) एक चांगला ,रोचक, रंजक चांगल्या पातळीवरचा प्रयोग (स्वत:च्या खिशातल्या चवल्या शाबूत राखणारा) म्हणून **"विच्छा माझी पुरी करा'**चा उल्लेख करायला हवा. वसंतरावजी ,विच्छा (समद्यांची) पुरी होते बरं का ! आता कसून झालीच पायजे (लावणी नव्हे—नवीन कलाकृति)










(पान १० वरून)

त्या काळात लेखणी अगदी तुफान वेगाने वापरली. विविध विषयांवर वापरली.

**प्र. :–** आपल्याला नाटकाची प्रेरणा कशी मिळाली ?

**रां. :–** माझे आयुष्य अनेक अपघातांनी भरलेले आहे. आकस्मिकपणे वळणे घेत घेत ते पुढे चालत गेले आहे. मी 'ओडियन' ह्या रेकॉर्ड कंपनीशी माझा संबंध आला कांहीतरी नवीन करण्याच्या भावनेने मी सदा भारलेला असतो. ओडियन कंपनीतही मी तसाच गेलो. तेथे सहा भागात एक संपूर्ण नाटक देण्याची कल्पना आम्हीं काढली. त्या नाटकाचे नांव होते **'शंभरावी मुलगी'** तो आमचा 'सेट' अतिशय लोकप्रिय झाला होता. त्यावेळी मी साडेतीन मिनिटांची नाटके लिहिली. लहान मुलांसाठी नाटिका लिहिल्या. १९३७ साली **माझा राजा** हा मोनोलॉग मी दुर्गा खोटे याजकडून रेकॉर्ड केला. नंतर मी 'यंग इंडिया' कं. त गेलो. तेथेही कांही नवे प्रयोग केले. मोठमोठ्या नटनटींच्या ओळखी झाल्या व त्यांतूनच आपण कांही नव्या धर्तीची नाटके सादर केली तर— असा विचार बळावला. सिनेमासारखेच 'रोज तीन शो' पद्धतीची छोटी नाटके आपण सादर करावी असेही वाटले. परंतु ती बाब, फारच खर्चाची ठरली म्हणून सोडून दिली. नंतर मी **'आशिर्वाद'** नाटक लिहिले. केशवराव दाते यांना वाचून दाखविले. त्यांच्याशी मी बावीस रात्री चर्चा केल्या. त्यांनी ते डायरेक्ट करावे ही मूळ कल्पना होती. परंतु त्यांचे माझे मतैक्य झाले नाही. त्यांतील प्रमुख भूमिकाही त्यांनी करावी अशी मूळ कल्पना होती पण सारेच फिसकटले. विष्णुपंत औंधकर यांना ते वाचून दाखविले. त्यांना ते आवडले. मी नाटककारी झालो व दिग्दर्शकही झालो. काल कांही नव्हते अन् आज घडले असे माझ्या बाबतींत वारंवार घडले आहे. मी दिग्दर्शकही असाच झालो. **'आशिर्वाद'** वर खूप पैसा खर्च केला. ईर्षा पेटली. **'कुलवधु'** लिहिले.

**प्र. :–** 'कुलवधु' नाटक आपले एक गाजलेले नाटक मानले जाते. त्या नाटकाची कांही कल्पना देता येईल ? किती दिवसात लिहिले ? कसे सुचले ? प्रतिक्रिया ?

**रां. :–** मला लेखनाला वेळ लागत नाही. माझ्या वृत्तपत्रीय जीवनाने माझ्यावर फार मोठे उपकार करून ठेवले आहेत. 'कुलवधु' नाटक मी अवघ्या चार-साडेचार दिवसांत लिहिले आहे. त्यावेळी कांही चांगल्या कुलीन स्त्रिया रंगभूमी चित्रपटाकडे वळूं लागल्या होत्या. त्या व्यवसायात कार कुनीपेक्षां जास्त पैसा मिळत असे. अशा कुलीन घरी पुरुषाच्या मनाची जी स्थिति होईल त्याची कल्पना मी केली व 'कुलवधु' नाटक लिहिले. 'आशिर्वाद' नाटकाचे वेळची माझी भूमिका अशी होती की, मुलींना जास्त शिकवूं नये. पैसा कितीही खर्च केला तरी ते 'परक्याचे धन' असल्याने तो फुकट जातो व माहेरचे संसार उध्वस्त होतात. त्यांनाही ते सुखाचे ठरत नाही. 'कुलवधु' नाटक पाहून तात्यासाहेब केळकर म्हणाले, नाटकात दोन चुका आहेत. तिसऱ्या अंकात भानुमतीच्या सत्कारात दृश्य न दाखवता ती स्वतःच्या सत्काराचे वर्णन करते ते पटत नाही व नाटकाचा शेवटही पटत नाही. "तिने नवऱ्याला सोडून जाणे योग्य वाटले नाही."

**प्र. :–** नाटके लिहायला बसल्यावर आता नाटकाचे सारे दृश्य visualise करता येते काय ?

**रां. :–** करता येते. कारण त्याचा निर्माता, दिग्दर्शकही मीच असतो. time factor डोळ्यासमोर सतत असतो. त्यामुळे माझ्या नाटकात रेंगाळणारे प्रसंग, अनावश्यक, कृत्रिम संवाद तुम्हांला सांपडणार नाहीत. सेट मांडूनच मुळी माझे नाटक पुढे जात असते. 'प्रॉडक्शन value' ही मला नेहमीच लिहितांना जाणवत राहते.

**प्र. :–** नाटक लिहायला बसतांना नाटकाचा कच्चा-पक्का आराखडा काढून मग लिहायला बसण्याची आपली पद्धत आहे किंवा काय ?

**रां. :–** कच्चे पक्के कसलेच आराखडे मी कोणत्याच लेखनाबाबत करूं शकलों नाही. मला तशी गरजच पडली नाही. मी लिहायला प्रारंभ करतो. आणि लिहून होते.

**प्र. :–** पण स्थूल चित्र डोक्यापुढे असेलच कीं !

**रां. :–** स्थूलच चित्र असते. पुढे नाटकाला पात्रेच खेचून नेतात, असाच माझा अनुभव आहे. 'कुलवधु'चीच गोष्ट सांगतो. त्याचा शेवट मनांत मी निश्चित केला होता. पण ती घराबाहेर पडून सासरीच जाईल हे मात्र मी निश्चित केले नव्हते. दुसऱ्या अंकातल्या सासू सासऱ्यांच्या हृदय परिवर्तनातून ती कल्पना मला संभाव्य वाटली व तो शेवट मी केला. नाटक लिहिता लिहिताच पात्रे जो प्रवास करतात त्यातूनच त्या नाटकाचा शेवट तर्कदृष्ट्या ठरत जातो असे मला वाटते. पुष्कळवेळा पात्रे आपले स्वयंभूच रूप धारण करतात असेही घडते. माझ्या मते नाटक हे त्या पात्रांच्याच हाती गेले पाहिजे. नाहीतर ते कृत्रिम होण्याची भीति असते.

**प्र. :–** आपल्या कुठल्याच नाटकाचा असा आराखडा आपण काढलेला नाही. ?

**रां. :–** नाही. खरं म्हणजे मला एखादी लहानशी कल्पना सुचते. आणि त्या कल्पनेवर मी एकदम लिहायलाच सुरुवात करतो. लिहिता लिहिता सारे कांही सुचत जाते. चिंतन वगैरे मी कांही करीत नाही. करूं शकत नाही. लिहिणे-लिहीत राहणे यातूनच माझे सारे लेखन झाले आहे. पुढे जाण्यासाठी लेखनात सतत लिहीत राहणे हेच मला बरे वाटत आले आहे. मी तेच करीत आलो आहे.








प्र. :– अशा पद्धतीने लिहितांना कधी गाडी चुकत नाही ?

रश. :– लिहिताना गाडी चुकत नाही. अडत नाही. मी अगदी matter of fact माणूस झालो आहे. त्यामुळे माझ्या लेखनात फाफट पसारा दिसणार नाही. भाषेचा फुलोरा दिसणार नाही. प्रतिभेचा दिव्य स्पर्श वगैरे जे कांही म्हटलं जातं ते दिसणार नाही. पण इमान दिसेल. पात्रांना न्याय दिलेला आढळतो. बाह्य उपचारांसाठी कधी मी अडत नाही. लेखन– आणले कारकुनी पद्धतीने होते. वृत्तपत्रीय कारकीर्दीतून हे आले आहे. मजकूराचा तगादा येवढीच गोष्ट मनापुढे असते.

प्र. :– आपण आपली सारी नाटके मध्यमवर्गीय समाजापुरतीच व त्यावरच लिहिली असे म्हटले जाते—

रां. :– (ताडकन्) आणि ते खरे ही आहे. त्याच समाजात मी जन्मलो, शिकलो, वाढलो. त्यातच मी वावरतो ज्या समाज जीवनाचा मला अनुभव नाही त्यावर कृत्रिमपणे लिहीत बसण्यापेक्षां मी माझ्या अनुभवांशीच इमान राखणे इष्ट नव्हे काय ? खरं म्हणजे असले आरोप प्रत्यारोप करण्यात अवाङमयीन दृष्टि अधिक दिसून येते असेच मला वाटते.

प्र. :– नाटककाराने नाटकात समस्यांची .उत्तरे दिली पाहिजेत असे आपले मत आहे काय ?

रा· :– नाही ! समस्या मांडणे हे नाटककाराचे काम आहे. summing up करून सांगण्याचे त्याचे काम आहे. प्रेक्षक ज्युरी आहेत. लेखक वकील आहेत. ते सारी केस नाटकाच्या द्वारे प्रेक्षकांपुढे मांडाणार, ती मांडतांना लेखकाची भूमिका कांहींशी वकिली होणे अपरिहार्य आहे. त्यांतून र ाची मते फार तर थोडीफार मांडली जातील. पण समस्येचे उत्तर त्याने दिले पाहिजे असे मला वाटत नाही. तसा त्याचा प्रयत्न नसतोच.

प्र. :– आपल्या नाटकातली पदे आपणच करता असे मला वाटते ह्यापूर्वी आपण कांही स्वतंत्र काव्यलेखन केले होते काय ?

रा. :– खूप कविता केल्या. आमच्या 'अरुण' मासिकासाठी ! 'गडकऱ्यांचा परिणाम माझ्यावर – खरं तर माझ्या पिढीवरच– खूप होता. पण आज त्या स्मरतहि नाहीत आणि त्याचे कांही रेकॉर्डही मजजवळ नाही.

प्र. :– आपल्या पहिल्याच 'आशीर्वाद' नाटकाबद्दल आज आपल्याला काय वाटते ?

रां. :– मला नाटक अजूनहि आवडते. त्यातली समस्या अजूनही कायम आहे असे मला वाटते.

प्र. :– नाटकांतल्या संगीतासंबंधी आपले मत काय ? आपली भूमिका काय होती ?

रा. :– 'संगीत' हा नाटकाचा एक Asset आहे असे मला वाटते नाटच हवेच. पण settings ने पथ्य, प्रकाशयोजना हे जसे Assets आहेत आणि ते चांगली असणे हे जसे नाटकाच्या यशाला कारण होते तसेच संगीत हेही नाटकाच्या यशाला कारणीभूत होते. त्यादृष्टीने मी त्याकडे पाहतो. मुळांतच गाणे घातलेच नाही तर मग विचारच नको. पण घातले, चांगले घातले, योग्य ठिकाणी घातले. गायक चांगले असले व गायले तर नाटकाच्या यशात भरच पडते असे मला वाटते.

प्र. :– लिहुनहि दीर्घकाळ रंगभूमीवर आले नाही असे नाटक ? कारणे कोणती ?

रा. :– वहिनी ! लिहून झाल्यावर सव्वा वर्षाने ते रंगमंचावर आले. योग्य 'वहिनी' मिळाली नाही हे त्याचे कारण. माझ्या डोळ्यासमोर माझ्या पात्रांची मी कांही चित्रे काढतो. वहिनीचे असे चित्र होते. कुणाही प्रत्यक्ष पात्राला पुढे ठेवून मी नाटके लिहीत नाही. पण त्या पात्राचे चित्र मी लिहितानांच visualise करीत असतो. होत असते.

प्र. :– एखाद्या नाटकाचा अनुभव ?

रा. :– 'रंभा' नाटकाबाबत असे झाले आहे. वृत्तपत्रांतल्या एका वार्तेवरून मला ते नाटक सुचले. पण लिहिताना का कुणास ठाऊक माझ्यापुढे सुधा करमरकर, मामा पेंडसे, पार्श्वनाथ आळतेकर ही माणसे नाचूं लागली. सुधा करमरकरला मी त्यापूर्वी एकदांच मामा वरेरकरांकडे पाहिले होते. पण रंभा लिहितांना अंतर्मनात पार्श्वनाथ, सुधा, मामा ही माणसे फिरूं लागली.

प्र. :– नाटकाच्या लेखना बाबतींत नेमके काय घडते ?

रां. :– मला सर्व प्रथम कल्पना सुचतात. स्वस्थ बसून, चिंतन करून वगैरे नव्हे. सारख्या सुचतच असतात. मग त्या कल्पनातूनच त्यांना suit होतील अशी कथानके सुचतात. नौकर लोक फार काम करतात. त्यांना कामच दिले नाही तर ? ह्या कल्पनेतून 'हेही दिवस जातील' सुचले व प्रयोग म्हणून मग तिघांनी लिहिण्याची कल्पना सुचली.

प्र. :– त्या प्रयोगाबद्दल आज काय वाटते ?

रां. :– तो प्रयोग चांगला झाला होता. तिसरा अंक अधिकच चांगला झाला असता तर तो प्रयोग यशस्वीही झाला असता.

प्र. :– 'आशीर्वाद' नाटकाने आपण नाटकाकडे वळलांत. ते नाटक आपण conceive कसे केले ते सांगाल काय ?

रां. :– फिल्ममुळे संवादाच्या दृष्टीने मी नाटकाच्या जवळ आलो होतो. पटकथा– संवाद माझेच असत. त्यांतून नाटकाची कल्पना आली. विषय नेमका कसा सुचला वा सुचतात हे सांगणे कठिण आहे. माझे विषय मी प्रत्यक्षांतून घेतले नाहीत. त्याला सऱ्याचा आधार नाही. 'माझे घर'च्या वेळी लोकांना कांही संशय आला. 'एक होता म्हातारा'चे वेळी हेच झाले. पण ते खरे नाही. मला सुचत जाते हेच खरे.

प्र. :– आपल्या लेखनासंबंधी आधी कांही नोटस् दैनंदिनी वगैरे ?

रां. :– छे : छे : !! मला ते कधीच जमले नाही. पूर्वी तर ह्याच सोडून ! नंतर ही त्याबाबततीत कांही रेकॉर्ड ठेवणे वगैरे जमले नाही. माझ्या लेखनापैकी कितीतरी लेखन गडप झाले आहे.

प्र. :– मग लेखनाचा भर वर ?

रां. :– होय ! Intuition नेच लिहायला बसतो. लिहून होते. माझे सारेच लेखन असे घाईने. वेगाने झाले आहे.

प्र. :– वृत्तपत्रीय कारकीर्दीत आपण विनोदी लेखन पुष्कळ केले आहे. पण आपल्या नाटकात मात्र 'विनोदी' म्हणता येईल असे एकच नाटक दिसते. हे काय ?

रां. :– मी कुठलेच संकेत असे नाटकात वापरले नाहीत. विनोद वापरला पण विनोदी नाटक लिहिले नाही हे खरे. माझ्या नाटकात 'व्हिलन' नाही. बदल म्हणून 'विनोद' नाही. परिस्थिती झालेली सांपडेल. पात्रांचे









स्वभाव निश्चित करून लियायला बसत नाही. मी फक्त पात्रांचा कारकून होतो. त्यामुळे नाटकाचा व पात्रांचा स्वाभाविक विकास घडत जातो. विनोदी नाटकाचा मुद्दाम असा प्रयत्न मात्र मी केला नाही हे खरे आहे. पण माझ्या नाटकात प्रसंगनिष्ठ विनोद मात्र भरपूर आहे.

प्र. :– आपल्या नाटकांकडे मागे वळून पाहता की नाही ?

रां. :– नाही. तशी मला कधी संधि मिळाली नाही. मीही ती घेऊं शकलो नाही."

प्र. :– **दिग्दर्शक** रांगणेकरांचा **नाटककार** रांगणेकरांना फायदा होतो की नाही ?

रा. :– होतो तर ! फार फायदा होतो. लेखनाला मी त्यामुळे ब्रेक लावूं शकतो. कुठही लेखन रेंगाळू देत नाही. असे क्षण त्यामुळे नाटकात येऊं देत नाही. माझ्या लेखनाला त्या भूमिकेचा फार फायदा झाला आहे.

प्र. :– लेखनाच्या संबंधी कांही सांगता येईल काय?

रां. :– माझ्या बाबतीत असे झाले आहे की, पहिल्या अंकाच्या शेवटी दुसऱ्या अंकाची सुरुवात सुचते. फक्त दुसऱ्याच अंकाची ! मग मी तो अंक लिहायलाच बसतो. चिंतन करीत बसलो तर महिनेन महिने मला कांही सुचणार नाही. मी ने लिहितच जातो. सुचते–लिहितो लिहितो–सुचत जाते.

प्र. :– लेखनाबाबत विशिष्ट वातावरणाचा आग्रह—

रां. :– मला एकांत वगैरे लागत नाही. उलट तो असला तर मला चालत नाही. वृत्तपत्रीय जीवनातूनच हे आले आहे. माझ्या घरी, विशिष्ट जागी मला लेखन करता येते. चिंतनाने मी एकाग्र होऊं शकत नाही. गडबड, गर्दी हवीच !

प्र. :– कल्पना सुचली तर ती सांगत राहणे वा लेखन वाचून दाखविण्याची आपली पद्धत आहे काय?

रां.:– कुणालाहि कल्पना सांगत नाही. ती लिहायलाच बसतो. नाटक वा लेखन कुणालाहि आधी वाचून दाखवीत नाही.

प्र. :– लेखनातील काही योगायोग?

रां. :– एक दिवस मामांकडे बसलो होतो. तेथे सुधा करमरकर आली. तिचे बोलणे मी ऐकले. त्या मध्यरात्री मी जागा झालो. शांतिदेवीची वाणी ऐकली. आणि कां कुणास ठाऊक मला सुधा करमरकर आणि तिच्यांत कांही सूत्र दिसले. सुधाच ती पूर्वजन्मीची कथा सांगते. असे दिसले. आणि त्यानंतर मी दुसऱ्याच दिवशी 'रंभा' नाटकाचा पहिला अंक लिहिला. चिंतन, विचारसुद्धां करावा लागला नाही. भरभर सारे सुचतच गेले.

प्र. :– नाटाकांच्या च्या अभ्यासाचा प्रत्यक्ष फायदा?

रां. :– त्यांतून चांगले लेखन करता येईलच असे नसले तरी त्यांचा उपयोग होईल खास!!

प्र.:–आपला आवडता लेखक—लेखनसाथी?

रां. :–सॉमरसेट मॉम हा माझा आवडता लेखक. त्याची माझी रास जमली आहे. जवळचे नाते असावेसे वाटते. खरं म्हणजे मी त्याच्या पासंगाला पुरत नाही. पण तो 'माझा' वाटतो खरा. शॉची मला आवडते. 'कोणे एकेकाळी'त तसा भाग आहे..

प्र. :–आपल्याकडे एकांकिकांबाबतचेही प्रयोग आपण केलेला आपला अनुभव काय?

रां. :–आपली परंपरा आठ आठ तास नाटके पाहणारांची आहे. तीन अंकी नाटके अपूर्ण वाटून उठून जाणारे लोक आहेत. नाटक लहान असूच शकत नाही असेच संस्कार. त्यामुळे एकांकिंचे प्रयोग अजून येथे पचनी पडले आहेत. असे म्हणता येत नाही.

प्र. :– त्या प्रकाराला लोकप्रियता मिळावी म्ह. काय करता येईल. ?

रां. :–अभ्यास मंडळापुढे एकांकिका सादर कराव्या. धंदा म्ह. नव्हे प्रयोग म्हणूनच! व्यावसायिक यश मिळणार नाही पण एक सतत लोकांच्या समोर राहील व कालांतराने तो स्थिरावेलही. कांही प्रयोग साठी तर कांहीं साठी असे करावेच लागेल. मने तयार करायला हवीत.

प्र. :– चांगल्या नाटकासंबंधीच्या आपल्या कल्पना?

रां. :–सांगणे कठिण! मला अजूनही ह्या प्रश्नाचे नेमके उत्तर मिळालेले नाही. प्रेक्षकांना नेमके काय हवे व आवडते तें सांगणे कठिण आहे. चिरंतन मूल्यें वापरून नाटक चांगलें होईलच असे नाही. तरी कुठे त्याच राहिल्या आहेत.? सारख्या बदलताहेत. चांगल्या पुरोगामित्व वगैरे मांडणारी नाटकेही नाटक म्ह. अयशस्वी झाली आहेत. आजच्या समस्या वेगळ्या आहेत. त्यामुळे काहीं जागा घेत आहेत. नाटच प्रभावी हवे. त्यासाठी काही नव्याही ही उपयुक्त ठरू शकतील. चांगले नाटक हे **'चांगले' "नाटक"** हवे. प्रेक्षणीय नव्हे. नुसत्या उपयोगी पडत नाही. वाङमयीन नाटक हे प्रेक्षणीयही हवे तरच ते यशस्वी ठरेल. चांगले ठरेल!

प्र. :–कांही स्वप्ने? संकल्प?

रां. :–मी कधी रोजनिशी लिहित नाही. पण रंगभूमीची व माझी रोजनिशी आता लिहिणार आहे. आणि मराठीतली उत्तम नाटके भारतातल्या निरनिराळ्या भाषांत भाषांतर करून ती त्या त्या स्टेजवर यावीत असा प्रयत्न करणार आहे. तसेच इतर भाषातली उत्तम नाटके मराठीत आणायची आहेत. त्यामुळे भारतांतील नाटककारांना परस्परांचा परिचय होईल. आज आपणा सर्वांना फक्त पाश्चात्य नाटककारांचीच नावे माहीत आहेत.

प्र. :– आपल्या वाङमयीन संसाराकडे पाहिल्यावर कांही मूलभूत चिंतन?

रां. :–मला असे वाटते की, लेखकाच्या जीवनाचा, त्याच्या व्यक्तित्वाचा त्याच्या वाङमयाच्या एकूण जडणघडणीत फार मोठा परिणाम होतो. माझ्या आयुष्यांत माझ्या वाटचाला सदृच्छेने जे एकलेपण आले त्याचा माझ्या वाङमयीन प्रकृतीवर परिणाम झाला असावा असे मला सतत वाटत आले आहे. मनाला प्रसन्नता देणारी सारीच कौटुंबिक सुखे मला पारखी झाली. आई वडिलांपासून सारी सुखे दूर गेल्याने एक प्रकारची पोकळी जाणवते. माझ्या च्या माणसाला घर मिळाले असते. कौटुंबिक आनंदी वातावरण मिळाले असते, तर माझ्या वाङमयात अधिक रसोलची झाली असती. एकटे जीवन जगणे ही लेखकाला दुर्बल बनविणारी एक जबरदस्त उणीव आहे. वास्तविक माझ्या वृत्तीत एकाकिपण अजिबात नाही. मी तसा राहूच शकत नाही. पण एकाकी असण्याचे जे योग आहेत त्याच्या कलासाधनेवरच परिणाम होतो. वाङमयनिर्मितीवर लेखकाच्या जीवनाचा परिणाम होतोच होतो असे मला निश्चित वाटते.

## प्रत्यक्ष नंदनवनात

सप्रेम नमस्कार वि. वि.

"अंदमान ते आनंदमान" ही माधव राजवाडेकरांची लेखमाला फार वाचनीय आहे. प्रत्यक्ष अंदमान-निकोबारच्या नंदन. वनात गेल्यासारखे वाटले. दिलीप चित्र्यांच्या हबशी चिराईतानंतर हा रुची-पालट फार चांगला वाटला, कळावे.

आपला,
**पु. भा. भावे**

## खरोखर खास अंक

आपला 'मे'चा अंक हा खास अंकाचा खास अंक झाला आहे. हल्ली खास अंक इतके निघतात की, त्यामुळे त्यांची अतिपरियाद अवज्ञा अशी स्थिति होते. अशा अवस्थेंत खरोखर खास वाटेल असा अंक काढणे ही चेष्टा नव्हे.

अंकांतील कुठचेही साहित्य विशिष्ट कलात्मक पातळीच्या खाली उतरलें नाहीं. भीमसेन जोशी यांचा त्यांच्या पिताजीनीं घडविलेला मनोज्ञ परिचय माझ्या कायम स्मरणात राहील असा आहे. श्री. गोपालकृष्ण भोवे यांच्या दिवाळी अंकातील कथा जमेस धरूनही मला या अंकातील कथा अधिक आवडली आहे. व्यंगचित्रामुळे तर दिवाळीच्याच आभास उत्पन्न झाला.

संपादनासाठी अविरत कष्ट घेऊन आपण आपल्या चाहत्यांचे प्रेम सार्थ केले आहे.

आपला.
**आनंद साधले**

## जमलेला सूर

स. न. वि. वि.

'मे' चा दीपावली मिळाला.

अंक एकदा चाळला. नंतर पुनः मग उत्साहाने वाचण्यासाठी हाती घेतला.

संगीताने मला फारच थोडे कळते.

पण या अंकाचे एकूण स्वरूप, मुख-पृष्ठ, आंतील मजकूर व आंखणी या सर्वांचा विलक्षण सूर जमलेला दिसून आला.

मासिक हातात घेतल्यावर पानापाना-वर प्रसन्नपणे नजर खिळवून ठेवण्याची त्यातील संपादन चतुरता मनोहर वाटली. एक निराळाच संगीत जाणवला. हा भोवे व अभिषेकींचा का? त्यांचे म्हणूनच अभिनंदन.

माधवराव राजवाडयांच्या प्रवासकथेला वेगळेच पत्र आनंदाचे परिणाम प्राप्त होत आहे. आणि त्यातील बोलकी 'रेखाचित्र— गच्च, भक्कम, भरपूर, भारदस्त व तरीहि कंटाळयाला कटाक्षाने टाळणारा असा दीपावली मासिकाचा हा 'संगीत विशेषांक' कितीतरी निरोगी आनंद देऊन राहिला आहे. यादूच्या कोकणच्या व गोव्याच्या भ्रमंतीत मी तो बरोबर घेऊन जात आहे.

राजकारणातील 'सूर व आसूर' ही सूर जमवतात व खेळकर आनंदात भर घालतात.

आपला
**प्रभाकर नेरूरकर**

## कल्पना आवडली

स. न. वि. वि.

संगीत विशेषांक चांगला आहे. कल्पना आवडली. सर्वच लेख चांगले आहेत 'नादपुत्र भीमसेन' त्यातल्या त्यांत

पुणें २ आपला.
**—अं. अ. कुळकर्णी**

## मुलाखत 'वजनदार' होण्यासाठी !

स. न. वि वि.

एप्रिल ६६ चा अंक वाचला. संपूर्ण अगदी'! प्रा. वामन चोरघड्यांविषयी माझ्या मनात अनेक प्रकारे कुतुहल होते, ते सार्थ झाले. मात्र प्रभाकर अत्रेंना इंग्रजी शब्दासाठी मराठी शब्द वापरता आले असते.

इ. कितीतरी) की मुलाखत "वजनदार" होण्यासाठी हे सगळे?

आदित्य, सारस्वत, बन्याबापू ही मंडळी भेटली आणि वैशिष्टचे जाणवली.

'अंदमान' मध्ये रेखाचित्रापेक्षा छाया-चित्रे असती. व तीहि भरपूर, तर मजा आली असती.

सर्वच कथा सुंदर व दर्जेदार वाटल्या. गोपालसिंग परदेशींचा 'तुकारामाचा शेवट' अभ्यासपूर्ण वाटला. एम्. ए. च्या अभ्यासाच्या वेळी हा विचार अनेकदा मनात येई. तुकाराम महाराजांचा खूनच झाला यावर अजून खूप संशोधन होणे जरूर आहे. श्रीं. रा. चि. ढेरेंनी याब बत काही लिहिले आहे की नाही, ठाऊक नाही. त्य ना आपण याविषयासाठीं पाचारण करावे.

तुमच्या चित्रांवर अगदी लहानपणा-पासून मी लट्ठ आहे. मात्र विनोदी चित्रां-साठीं आपण परदेशी चित्रांकडे धाव घ्यावी, हे बरे वाटले नाही.




—एकूण अंक "विशेष–अंक" वाटला!!

२६६, विठ्ठलवाडी आपला.
वाडा फावडेगल्ली **भास्कर दोडे**
नासिक.

## अभिषेकींची समर्थ भाषा

स. न. वि. वि.

मे ६६ चा आपला संगीत-विशेषांक वाचला अंक आवडला, वाचनीय काढल्याबद्दल आपले व लेखकांचे अभिनंदन.

दीपावली मासिकउच्च वाङ्मय, उच्च अभिरुचि निर्माण करणारे दर्जे-दार साहित्य प्रसवणारे मासिक आहे उच्च, दर्जेदार, चांगले वाचल्याचे समाधान धान फक्त दीपावलीच देऊ शकते.

गोपालकृष्ण भोबे यांची 'तानसेन' वरची कथा आवडली. विद्याधर गोखले यांनी सांगितलेल्या चीजा, व त्यांचा दुग्धशर्करायोग 'चांगला' एकजीव झालाय. भीमसेन जोशींचा परिचय त्यांचे कर्तृत्व, साधना, व्यासंग, यांचा परिचय करून देतो.

अभिषेकींची 'भाषा'—ही संगीत-काराच्या जीवनावरील आधारलेली कथा आवडली. कलाकराचे दरिद्री जीवन उत्तम भाषेंत प्रभावीपणे रेखाटलेय. त्यांना अभिनंदन कळवा अंदमान ते आनंदमान ही लेखमाला तेथले चित्र डोळयासमोर आणते. दीपमाला, मैफल, माहतीपूर्ण चौकटी व इतरही कथा कथा आवडल्या.असो. असेच दर्जेदार साहित्य वाचावयास मिळो. अभिनंदन व आभार.

आपला,
**सु. द. भडभडे**

## कलापूर्ण मेळ

श्री. संपादक "दीपावली" यांस

सप्रेम नमस्कार विनंती विशेष,

आपल्या मासिकाकडे गेल्या एका वर्षापासून माझे आकर्षण वाढले आहे.








ह्याची मुख्य कारणे म्हणजे इतर मासिकापेक्षा आपल्या मासिकांत कांहीं तरी वेगळें वाचावयास मिळतें. हे वेगळे केवळ टूम म्हणून सादर केलेले नसतें. ते अभिरुचि आणि वाचनीयता ह्यांचा कलापूर्ण मेळ असते. उल्लेखनीय म्हणजे आपल्या मासिकातील संपादकीयाला धरून प्रकट केलेली सदरे "आम्ही असे लिहितो" आणि 'सन्मान पुष्पे' ही सदरे फारच रंजक आणि उद्बोधक वाटतात. उदा. गेल्या महिन्यातील पु. ल. देशपांडे ह्यांना वाहिलेले पुष्प खऱ्या अर्थाने सन्माचाचे आहे. पु. ल. वर इतके विपुल (आणि रटाळही) लिहिले गेले पण असे औचित्यपूर्ण आणि खोचक कुणी लिहिले नाही. आतां हे पत्र लिहावयास मी जो उत्सुक झालो त्याचे कारण म्हणजे आपण सादर करत असलेले अंदमानाचे प्रवास वर्णन होय. पहिल्या हप्त्यावरच लिहिणार होतो पण बऱ्याच वेळा पहिला लेख हा आरंभी शूरत्वांच्या उत्साहानें चांगला उठलेला असतो पण ह्या प्रवास वर्णनाचा दुसरा हप्ता वाचल्या वर हे लेखन निव्वळ आरंभ शूरत्व किंवा आत्मप्रसिद्धिच्या ओढीने लिहिले जात नसून कांही तरी मौलिक संपन्न करण्याच्या दृष्टीनेच प्रेरित आहे हे स्पष्ट आढळते. दुसरा लेखांक हा पहिल्या लेखांकापेक्षा फारच सरस आहे.

आपला मार्चचा अंक जसा पहिल्या पासून शेवटपर्यंत रंजक होता तसा एप्रिलचा अंक नाही. मात्र चोरघडयांची मुलाखत चांगल्या मुलाखतीपैकी गणावी लागेल. आपले नवे सदर "असे ऐकले" नाट्यपूर्ण आहे. आपला,

## संततुकोबांचा शेवट

स. न. वि. वि.

—एप्रिल १९६६ च्या अंकात श्री. गोपालसिंग परदेशी यांचा 'संत तुकारामाचा शेवट' हा लेख जरा उत्सुकतेनेच वाचला. लेख नवीन माहितीने भरलेला आहे त्यात लेखकाची अभ्यासू वं संशोधक वृत्ती लक्षणीय आहे. प्रस्तुत लेखांत तुकोबांच्या निर्याणसंबंधी जी माहिती दिली आहे. ती सर्व सामान्य भाविक जगासही धक्का देणारी आहे. एवढेच नव्हे तर त्यांच्या निधनाचा की (निर्याणाच्या) संबंधाने आजवाजे अन्यत्र दिले आहे ते जरा वेगळे वाटते.

श्री. परदेशी यांचा हा लेख उत्तम आहे यांत संशय नाही. आम्ही तो एक विख्यात संशोधक लेखक—श्री. वा. सी. बेंद्रे यांजकडे अवलोकनार्थ (मताअभिप्रायार्थ) पाठवीत आहे. जर त्यांचेकडून काही यालेखाबद्दल तुमचेकडे आलेच तर ते मत दीपावलीत जरूर छापणे. संत तुकोबांच्या बाबतीत जिज्ञासू जगाला त्याचा उपयोग होईल. आपण या बाबतीत माझेबद्दल गैरसमज करू नये. प्रस्तुत लेख श्री. बेंद्रे किंवा प्रा. नर फाटक यानी पाहिलाच असेल. नसल्यास त्याना दाखवावाही विनंती.

आपला
**दत्तु गोरे**

---

बद्दल मोजक्या, वेचक व लक्षवेधी वातम्या बुलेटीन द्वारा देण्याचा झाला. दुसरा टप्पा नभोवाणीवर अंदमानला विशेष स्थान आणि त्या बातम्यांचे वितरण, आणि तिसरा टप्पा जो गाठण्याचा मानस तो तसा होना कीं, अंदमान येथे नभोवाणी 'केंद्र संभव युगे-युगे' व्हावा आणि अंदमानचे वृत्त नभोवाणीवर प्रक्षेपित व्हावयास सुरू झालं होतं. पण दर शनिवारी अर्धातास अंदमानकरता अर्धातास जेव्हां खास देण्यांत आला तेव्हां जुन्या परिभाषेंत (आणि पारंपारिकहि) ज्याला आकाशवाणी झाली' म्हणत तिचा अक्षरशः व स्वरशः साक्षात्कार झाला. नभोवाणीवरून मायभूमीतले अंदमानकरता आणि अंदमानचे मायभूमिकरता नवल वतू लागले. लोकशाहीचा प्रचंड प्रयोग करणाऱ्या उपखंडमय मायभूमिचा एक अविभाज्य घटक अंदमानहि त्यांत गतीने, आत्मीयतेने संवादी साथ देऊं लागल्याचे सर्व जगाला कळूं लागले. आज त्यावेळच्या एका शुभ संयोगाचे या ठिकाणी स्मरण होते ते असे कीं या अंदमानकरता अर्धातास खास कार्यक्रमाच्या उद्‌घाटनाचे भाषण आजच्या भारताच्या पंतप्रधान श्रीमती प्रियदर्शिनि इंदिरागांधी यानी केले होते.

—हे असें झाले. होत गेले. जे होत होते त्याला लोक 'जमान' होते. क्लॉक टॉवरचे 'वायुमंडळ' मग बदलले. सत्याचा विपर्यास मंदावला. हेवे दावे, अपसमज, गैरसमज, आणि पूर्वग्रह इ. च्या कच्चा मालातून तयार होणाऱ्या अफवांचा कारखाना पुढे बिनधोकपणे चालणे शक्य नव्हते. त्याला सामाजिक आणि विधायक वळण लागण्याचा पाया मिळाला.

पाणपोयी लाभली. आमचीहि हिंमत वाढली. उत्साह शतगुणित झाला, अंदमानला स्वतःच 'आवाज' उठवण्याकरता नभोवाणीचे अधिष्ठान ? एक छोटे केन्द्रे मिळाले तर ? प्रयत्नांचा इतिहास आणि त्या इतिहासाला प्रत्यक्षात लागलेले फळ यांची कहाणी पण मोठी मनोरंजक आहे. नवे केन्द्र मिळवायचे म्हणजे सहजसध्या गोष्ट नव्हती. खुद्द सरकारने एवेळ मंजूर टरायचं ठरवलं तरी स्वतंत्र मिळणे आंतरराष्ट्रीय तत्संबंधीच्या संघटनेवर अवलंबून होते. त्यामुळे मार्ग सुकर नव्हता. निर्धोकहि नव्हता. पण गंमत अशी कीं, त्यावेळचे नभोवाणीचे डायरेक्टर जनरल श्री. माथुर यानाच पूर्वी दिलेल्या वेव्हलेंग्थस् वापरा नाही तर परत करा ( ) अशी नोटीस या संघटनेच्या द्वारा देण्यात आल्याचे वर्तमान पत्रावरून कळले. याचा फायदा अंदमानला झाला. आम्हांकरून घेतला. श्री. माथूर याना विनंति करण्यांत आली आणि सर्व रितसर होऊन इ. स. १९५९ मधे मंजूरी आलीहि. मायभूमीच्या बातम्या कानावरून बुद्धींत आणि बुद्धितून चित्तात जाऊन खळबळ माजवूं लागल्याच होत्या. जवळीक वाटायला लागण्याच्या प्रक्रियेला आता अंदमानाची अस्मिता प्रकट होण्याची जोड मिळाली. एक प्रश्न उपस्थित झाला कीं, नभोवाणी केन्द्र संपन्न व्हायचे तर त्याला अनुरूप वास्तु हवी. एक, गावच्या वस्तीपासून तोडलेला उंचीवर बंगला होता. पूर्वी तिथे चिफ कॉन्झेव्हेटर राहत होते. ते बदलून गेले. बंगला आयताच होता. त्याची निवड झाली. अगदी आचार्य विनोबांच्या भाषेंत, लोकांच्या आणि सर्वांच्या करता बोलण्याचे काम संपून 'कामाचे बोलणे' सार्थ व्हायचे 'अजिम्यां पाहिले' असें जणुं झाले ! प्रत्यक्ष केन्द्राचे उद्घार न इ. स. १९६१ मधें झाले...

—असे जवळ येणे आणि एक होणे चालू असताना जी होळी प्रथम आली (१९५९ साली) तीहि पूरक ठरली. आपले भारतीय सण सामाजिक उत्सवच होत. फक्त उपचारांना आचाराचा बुद्धिनिष्ठ आणि समाजानुगामी अर्थ दिला पाहिजे. आपले दिवंगत पंतप्रधान जवाहरलालजींनी ही गोम ओळखली होती. दिल्लीतहि रामलिला मैदान आणि पंतप्रधानांचे निवास स्थान ही या आविष्कारची अधिष्ठानें झाली होती. आम्ही अंदमान येथें होळी साजरी केली. 'रंजले—गांजले' रंगले. अपूर्व उत्साहात रमले. सारे सारें विसरले. जीवनांत दुःख विसरायचे असते आणि सुख लुटायचे असते— अशा-क्रिडेंत जो आनंद असतो त्याचे रंग होळीत उधळलेल्या मनोहारी रंगावरहि मात करणारे ठरतात. (क्रमशः)

डोकेदुखी ? सर्दी ? फ्लू ?

नवें !

# अवेदन®










**आश्चर्यकारक 'एपॅप' युक्त :
खालील रोगांपासून त्वरित
अन् निश्चित आराम
मिळविण्याकरितां**




अवेदन हें एक नवें औषध आहे. तें अवश्य वापरून पहा. डोकेदुखी, दांतदुखी, पाठदुखी, स्नायूदुखी, सर्दी, फ्लू आणि स्त्रियांना विशिष्ट दिवसांत होणारा त्रास यांपासून त्वरित अन् परिणामकारक आराम मिळविण्यासाठीं अवेदन हें स्क्विब्जनी शोधून काढलेलें औषध आहे.

अवेदन हें अजोड औषध आहे ! इतर त्वरित गुणकारी आणि बिनधोक औषधींबरोबरच त्यांत आश्चर्यकारक 'एपॅप'चा समावेश केलेला आहे.

अवेदन हें वेदनांपासून आराम देणारें बिनधोक, त्वरित गुणकारी अन् संवय न जडवणारें औषध आहे.

प्रमाण १ किंवा २ टॅब्लेटस्
किंमत प्रत्येक टॅब्लेट्ला सुमारें ८ पैसे

**अवेदन®**

साराभाई केमिकल्स

SQUIBB®

**आश्चर्यकारक 'एपॅप' युक्त
कित्येक तासपर्यंत टिकणारी वेदना
मुक्ति अवघ्या कांहीं मिनिटांत !**

® हा ई. आर. स्क्विब अँण्ड सन्स इन्कॉर्पोरेटेड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे व तो करमचंद प्रेमचंद प्रायव्हेट लि. यांना वापरण्याचें लायसन्स आहे.

अनुक्रमणिका

